ोळकर सरकार ग्रंथमाला पुष्प ३० वें.

# नीति आणि कलोपासना

लेखक

**ग. वा. कवीश्वर, एम्. ए.**

'दि मेटॅफिझिक्स् ऑफ् बर्कले' या पुस्तकाचे कर्ते,

आणि, माजी फेलो, इंडियन् इन्स्टिट्यूट् ऑफ् फिलॉसफी.

इसवी सन १९३४

शालिवाहन शक १८५६

# प्रकाशकाचे दोन शब्द



श्रीईशकृपेनें शारदासेवासंघाची स्थापना होऊन आज उणी-पुरीं दोन वर्षें पूर्ण झालीं आहेत. या अवधींत संघाने केलेली स्पृहणीय कामगिरी कोणत्याही संस्थेला अभिमानास्पद होईल अशीच आहे, असे म्हणण्यात यत्किंचितही अतिशयोक्ति नाहीं. साप्ताहिक वादविवाद, महत्वाचे उत्सवसमारंभ, साहित्यचर्चा, व्याख्यानमाला, असे एकाहून अधिक वरचढ टप्पे गाठीत, संघाने आज पुस्तकप्रकाशनापर्यंत मजल गाठली आहे. सर्वसाधारण जनतेत साहित्यसेवेच्या दृष्टीने जागृति उत्पन्न करण्याच्या ध्येयासाठीं, संघाचें क्षेत्र आता केवळ मंडलेश्वरइतकेच मर्यादित राहिले नसून, तें महाराष्ट्राइतकें व्यापक झालें आहे. इतक्या थोड्या अवधींत इतकी प्रगति फारशा संस्थांच्या वाटेस येत नसल्यानें, शारदासेवासंघाच्या सभासदास त्याबद्दल साभिमान आनंद होऊन, ज्या श्रीशारदेच्या कृपाछत्राखालींच संघाचे सर्व व्यवहार चालून आजचा हा सुदिन दिसला, तिच्याविषयीं कृतज्ञतेनें त्यांचीं अंतःकरणें भरून आलीं तर ते साहजिकच होय.

प्रस्तुत पुस्तकाचें महत्व विशेष वर्णन करून सांगण्याचे कारण नाहीं. कला आणि नीति यांच्या संबंधाविषयींच्या

वादाशीं आतां महाराष्ट्रांतील सर्व सुशीक्षित परिचित झाले आहेत. अनेक मासिकांतून व नियतकालिकातून या विषयावर उलटसुलट लेख प्रसिद्ध झाले असून साहित्यक्षेत्रात मोठ्या पदवीस चढलेल्या कांहीं व्यक्तींनीं कला व नीति याचा संबंध नाहीं असें मत प्रतिपादन केले आहे. हळूहळू त्याविरुद्ध प्रतिक्रिया सुरू होऊन, त्या मताचा दबत दबत निषेध करणारे अस्पष्ट आवाजही अलीकडे कानावर पडूं लागले आहेत. अशा या मतामताच्या गलबल्यांतून कोणाच्याही वैयक्तिक मोठेपणाची भीड न ठेवतां योग्य मार्ग काढून, कलेचा नीतीशीं निकट संबंध सप्रमाण सिद्ध करणारे एकही पुस्तक मराठी साहित्यात तरी नव्हतें. ही अत्यंत तीव्रतेनें भासणारी उणीव या पुस्तकाचे द्वारे अंशतः तरी भरून निघेल, व यात लेखकानीं पृष्ठ ९८ वर म्हटल्याप्रमाणे, “ श्रीशारदेवरील तिच्याच काहीं भक्तानी उठविलेला नीतिअनीतीविषयीं उदासीनतेचा अगर बेपर्वाईचा असन्मूलक आरोप ” खोडून काढण्यास हे समर्थ होईल अशी शारदासेवासंघास पूर्ण आशा आहे.

या पुस्तकांतली विचारसरणी एकांगी किंवा कोती नाहीं याची साक्ष हे देईलच. शिवाय, यात विरोधकाच्या विधानाकडे दुर्लक्ष केलें नसून, त्याचा शक्य तितका विचार केलेला आहे. परंतु, याचाच एक परिणाम म्हणून यात विषयानुरोधाने अनेक विद्यमान साहित्यसेवकाच्या एतद्विषयक मतावर टीका आली

आहे. प्रचलित मराठी वाङ्मयात उच्च प्रतीचें व सद्धेतमलक टीकात्मक साहित्य फारच कमी आहे ही सर्वमान्य गोष्ट आहे. व म्हणूनच या पुस्तकाचा विद्यमान साहित्यिकाच्या मतावर योग्य टीका हा एक विशेषच ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं. ही टीका पूर्णपणे सद्धेतुमूलक, निःपक्षपातीपणाची व केवळ तत्व-निर्णयार्थ केलेली असून, त्यात कोणाचेंही मन दुखविण्याचा हेतु नाहीं. या पुस्तकातल्या एकाही वाक्याचा व्यक्तिद्वेषाशीं दूरचाही संबंध नाहीं. ज्याच्यावर यांत टीका आली आहे त्यानीं किंवा त्याच्या भक्तानीं कृपा करून इकडे अवश्य लक्ष देऊन नंतरच हे पुस्तक वाचावे, ह्मणजे विनाकारण गैरसमज होणार नाहीं. सुदैवाने टीकात्मक वाङ्मयात श्री. कवीश्वराचा हा पहिलाच प्रवेश नाहीं. एका पाश्चिमात्य विद्वान ग्रंथकाराच्या काहीं विधा-नावर त्यानी केलेल्या मार्मिक टीकेबद्दल, त्या विद्वानानें स्वतःच कसे सूज्ञपणाचे उद्गार काढले आहेत हे यांत इतरत्र दिसून येईल. असेच शांतचित्त ठेवून यातील टीकेलाही कोणी उत्तर दिले तर लेखकाबरोबर आह्मालाही त्यात आनंदच होईल.

श्री. कवीश्वर याचें प्रकृतिस्वास्थ्य व विशेषतः मनःस्वास्थ्य काहीं कारणामुळे गेल्या काहीं महिन्यापासून चागल्या स्थितीत नसताही, त्यानीं संघाच्या सभासदाच्या आग्रहाच्या सूचनेवरून हें महत्वाचें पुस्तक इतक्या उत्तम रीतीने द्वितीय संमेलनापूर्वी पूर्ण करून संघास तें प्रकाशित करण्याची संधि दिली, याबद्दल

शारदासेवासंघ त्याचा आभारी आहे. ते लवकरच " तर्कशास्त्राच्या मौजा " या नांवाचें शास्त्रीय विषयावरील एक अत्यंत मनोरंजक पुस्तक लिहिणार असून, तेंही संघातर्फे योग्य वेळीं प्रसिद्ध होईल अशी आशा आहे.

या पुस्तकाच्या प्रकाशनाच्या कामीं इंदूरच्या महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक मंडळाने दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल संघ मंडळाचा सदैव ऋणी राहील. विशेषतः त्या मंडळाचे उत्साही चिटणीस प्रो. वा. गो. ऊर्ध्वरेषे, एम्. ए., काव्यतीर्थ, यानी आपुलकीने जें साह्य केलें त्याचा येथें कृतज्ञतापूर्वक उल्लेख करण्यात संघास फार आनंद होत आहे.

पुस्तकप्रकाशनाचे समारंभप्रसंगी अध्यक्षस्थान स्वीकारण्याची संघाने केलेली विनंति आपले अनेक महत्वाचे व्यवसाय दूर सारूनही महाराष्ट्रातले सुप्रसिद्ध साहित्यसेवक प्रो. वा. म. जोशी यांनी आनंदाने मान्य केली, व अशा रीतीने या पुस्तकाला आपल्या मंगल शुभाशिर्वादाने गौरविलें, याबद्दल संघाने त्यांचे कितीही आभार मानले तरी ते तोकडेच होतील.

या पुस्तकप्रकाशनाचे द्वारें केलेली अल्पस्वल्प सेवा श्री शारदेच्या चरणारविंदी रुजू होऊन, तिच्या सेवेसाठींच स्थापन झालेल्या या संघाचे हातून तिच्याच कृपेनें तिची सेवा उत्तरोत्तर अधिकाधिक प्रमाणांत घडो, अशी नम्र प्रार्थना करून हे ' दोन शब्द ' आह्मी संपवितो.

**शारदा-सेवा-संघ, मंडलेश्वर.**

# लेखकाची प्रस्तावना.

लेखक व प्रकाशक यांमधील संबंध प्रेमाचे व आपुलकीचे असले म्हणजे उभयतांनीं परस्पराच्या कामांत साह्य करावें हे साहजिकच आहे. प्रकाशकानी आपल्या " दोन शब्दांत " लेखकाची बाजू पुष्कळ अंशाने मांडलीच असल्याने, आतां येथें एक दोन विशेष गोष्टींचा उल्लेख करण्यापलीकडे अधिक कांही उरले नाही.

हे पुस्तक लिहिण्याच्या कामी प्रत्यक्ष अशो दोनच व्यक्तींची मदत लेखकाला झाली आहे. एक, माझे ज्येष्ठ बंधू रा. रा. भालचंद्र वासुदेव कर्वीश्वर व दुसरे महेश्वरचे उत्साही साहित्यसेवक श्री. म. रा. उपासनी. या दोघांचेही साह्य खरोखरच अमूल्य झाले असून, यांच्या प्रेमळ प्रोत्साहनाचे अभावी अस्वस्थ मनःस्थितीत हे पुस्तक केव्हा पूर्ण झाले असतें हे सांगवत नाही. श्री. उपासनी यांचा साहित्यविषयक उत्साह अत्यंत दांडगा असून, परिस्थिति विशेष अनुकूल नसतांही साहित्यसेवेचे त्यांनी चालविलेले व्रत पाहिले, म्हणजे कोणालाही त्यांचेबद्दल सादर कौतुक वाटल्याशिवाय रहाणार नाही. अत्यत प्रबल इच्छेची परिणति अनुकूल परिस्थितीच्या उत्पत्तीत होते, हे जर खरें असेल तर श्रीशारदेच्या कृपेनें यथेच्छ साहित्यसेवा करण्यासारखी अनुकूल परिस्थिति केव्हातरी त्यांना प्राप्त होईल अशी आशा प्रदर्शित करणे अगदींच अनाठायी होणार नाही. शारदासेवासंघातर्फे लवकरच त्यांच्या लिखाणाचे एक पुस्तक प्रसिद्ध होणार आहे असें कळतें. तर्से,

'माळवसाहित्या'च्या 'इंदूरविशेषांकां'त प्रसिद्ध झालेली त्यांची "घरटें" नामक एक गद्यकाव्यात्मक उत्कृष्ट लघुकथा अवश्य वाचावी, म्हणजे या तरुण अभिजात लेखकाच्या उच्च लेखनाची थोडीशी कल्पना येऊं शकेल अशी आग्रहाची सूचना आम्ही वाचकांस येथे करितों.

या पुस्तकाचे शेवटी लेखकाने 'युक्ति' व 'कला' यांच्या फारकतीविषयी एक सूचना केली आहे. कोणाला कदाचित् ती पटली नाहीं, तरी तेवढ्यावरून कला व नीति यांच्या आवश्यक संबंधाच्या प्रमेयालाच नाकारण्याची घाई कोणी करूं नये, अशी सूचना करणें येथे आवश्यक आहे.

शेवटी वाचकांना, अभिप्रायलेखकांना व टीकाकारांना एक अगत्याची विनंति करून ही प्रस्तावना संपवितो. या सर्वांनी या पुस्तकाबद्दल व त्यांतील महत्वाच्या मध्यवर्ती प्रमेयाबद्दल कोणतेही निश्चित मत व्यक्त करण्यापूर्वी कृपा करून सर्व पुस्तक एकदां अवश्य वाचून काढावे. असे न करतां घाईघाईत भलतीच विधाने जाहीरपणे केल्याचे अप्रिय अनुभव लेखकाला दुसऱ्या एका पुस्तकाचे बाबतींत अनेक वेळां आल्यानेच हे सुचविणे येथें भाग पडले आहे, या गोष्टीकडे लक्ष देऊन कोणीही या नम्र सूचनेबद्दल गैरसमज करून घेणार नाहीं अशी आशा आहे.

गुरुवार, मा. शु. १५।१८५६
दत्तजयंति.
ता. २०-१२-१९३४.

**ग. वा. कवीश्वर.**

# Some Specialities of This Book.

1. This book contains a comparative study of the Indian and the European schools of thought, and includes two very interesting and instructive comparisons,—one, of the idealism of Berkeley with that of the Vijnanavadin Bauddhas, and the other of the doctrines of Shankaracharya with those of the modern Western critics of Berkeley and Hume

2 While intended primarily for students of Berkeley's metaphysics, this book will be found useful even for the members of the general public who wish to be acquainted with the fundamental problems of metaphysical controversies Special mention may here be made of Book I Chap I, Book II Chap. I, and Book III Chaps I to IV

3 The preface of this volume gives utterance to a very important protest concerning the treatment accorded to the study of Indian Philosophy in a considerable number of the Indian universities, that deserves to be considered carefully by every educated Indian

Nothing more need be added here except the following very highly appreciative opinions expressed upon the book by eminent Indian and foreign philosophers, as well as by famous journals.

# Some Opinions.

1 **Dr. Sir S. RADHAKRISHNAN,** M A., D Litt, Vice-chancellor, Andhra University, ( Gifford Lecturer at Oxford for 1929 )· "Tho account of Berkeley's Metaphysics is **quite clear and careful** and the comparisons with Indian schools enhance the value of the

book. I have no doubt that Indian students **of** Berkeley's philosophy will find your book **exceedingly useful** "

2. **Prof. C. E. M JOAD,** the well known **English** philosopher, writes in *The Aryan Path* ( May 1934 ) " Mr KAVEESHWAR has written **a scholarly study of Berkeley's metaphysics. The exposition is clear, the treatment sympathetic, the criticisms acute, and** the general thesis is one that will commend itself to Indian philosophers One of the merits of the book is, indeed, the **frequent parallels** which the author draws between the doctrines of metaphysicians belonging to different civilizations separated in space by half the globe and in time by centuries "

3 **Dr G. A. JOHNSTON,** M A, author of the well-known work " *Development of Berkeley's Philosophy,* " writes from **Geneva ( Switzerland )** ( 9th Nov 34 ), " I have read this with great interest, and wish to congratulate you on **your notable contribution to the history of Berkeley's philosophy. I found your exposition remarkably clear** and readable, and **your criticism and examination** of the metaphysical foundation of Berkeley's work **gains enormously** from your applying to it some of the criteria of the Indian schools of thought It is really very pleasing to all students of Berkeley to note that so many valuable books on his work have recently been published, particularly, **in addition to your own,** those of Professor Dawes Hicks, Prof Luce, and prof Hecht I have also read with interest your appendix dealing with my treatment of Berkeley's criticism of Locke's doctrine of Abstraction **If my book ever reaches a second edition, it would certainly be necessary for me to take account of your searching analysis of my arguments.** "

4. **Prof. K C. BHATTACHARYA,** M A , P R S, Director of the Indian Institute of Philosophy and President of the Ninth All India Philosophical Congress ( Poona ) writes:—"It is **an excellent critical study of Berkeley.** The author has tried to present **his independent estimate** of the idealistic philosopher The **work** shows a careful study of idealism and a firm grip of connected philosophical problems The references to *Vijnanavada* and the Sankarite view are **interesting and instructive.** "

5. " It is **a comprehensive survey** of the philosophy of Berkeley The treatment is analytical and critical **The exposition is very clear and lucid and the critical estimate fair and impartial. Comparisons** of Berkeley's idealism with the *Yogachara* idealism and Berkeley's critics with Shankaracharya **are very interesting and illuminating " J. N. SINHA** M A , Professor of Philosophy, **Meerut College,** Meerut

6. "I was much pleased with it It is fitted to be of great service to students... It is **very satisfactory.** .. ..I have already recommended your book to our students." **Rev. A. A. SCOTT,** M. A B. D B Paed , Principal and Professor of Philosophy, Christian College, **Indore**

7. " **An excellent one.** I have already recommended it to our students " **P. M. BHAMBHANI,** M A., Professor of Philosophy, **Agra College,** Agra.

8. " . . . Your **excellent treatise** on Berkeley's Metaphysics Indians are now coming in line with their Western confreres in the critical study of Philosophy and your present volume augurs well for your career in this field " **P. K. GODE,** M. A , Editor, *The Review of Philosophy and Religion,* **Poona**

9 "We congratulate the author on his bringing out **such a comprehensive critique of Berkeley.** ...It must be said to the credit of the author that **his analyses are clear and exhaustive, reasons freely corroborated by** statements of great philosophers and of Berkeley himself, **and conclusions just in many cases . It is a pity that our scholars do not bring out such books in abundance.** "--*Prabuddha Bharata or Awakened India*, January 1934

10 " Mr KAVEESHWAR presents **a clear and readable** account of Berkeley's philosophy He has spared no pains to bring out **all the salient features of Berkeleyianism:** its historical significance, the distinction between " ideas " and " notion " and their consequences **The criticisms levelled against Berkeley go home** The student, especially the beginner is sure to find Mr KAVEESHWAR's work quite useful and interesting its usefulness is increased by an index and a select bibliography " *The Philosophical Quarterly*, January 1934

11 " Deeply impressed with the striking **resemblance** between the metaphysical systems of Berkeley and Sankara and that of the vijnyanavadins, Mr KAVEESHWAR has worked out **carefully and constructively** a critical study of the Metaphysics of Berkeley in the light of modern philosophy I have no doubt that the sustained study of the philosophy of Berkeley by Mr. KAVEESHWAR will delight students of **comparative Metaphysics** Mr KAVEESHWAR's work on Berkeley will be **a fine text useful to candidates preparing for the degree Examinations with Berkeley as a special subject.** " *The Hindu*, Educational and Literary Supplement, **Madras**, 16th Oct 1934

12 " In this bulky volume we are treated to a critical examination of one of the most interesting and novel metaphysical systems **his scholarly work** The chief feature of it is **his eminent success** in the task he has set before himself owing to his knowledge of both the Indian and Western schools of thinking We are sorry that special references to **his illuminating criticisms** are impossible for considerations of space **This remarkable work.** . On the whole the work is **an exceedingly interesting and instructive one** and the author has to be congratulated on **his signal success in presenting his subject matter in the most attractive language, avoiding unnecessary abstruse terms and shibboleths** "*United India and Indian States*, Delhi, 30th June 1934.

# नीति आणि कलोपासना

## अनुक्रमणिका

श्री

# नीति आणि कलोपासना.

## उपोद्घात.



महाराष्ट्रात अलीकडे ज्या काही थोड्या महत्त्वाच्या विषयावर विशेष उत्साहाने वादविवाद चालला आहे, त्यामध्येच नीति आणि कला यांच्या परस्पर संबंधाचा प्रामुख्याने समावेश केला पाहिजे यात शंका नाही. वर्तमानपत्रातून, मासिकातून, विद्यालयीन विवादसंघातून, व्याख्यानातून, पुस्तकातून, साहित्य-संमेलनातून, फार काय, न्यायालयातील खटल्यातून देखील या वादाचे पडसाद जोरजोराने उठत असून, त्याप्रीत्यर्थ उलट सुलट योद्धयांची रणे माजत आहेत. महाराष्ट्रात या वादाचा उगम 'ओलेती' च्या चित्रापासून झाला असो, किंवा काही पुस्तकांच्या अनिष्ट प्रकाशनामुळे झाला असो, अगर दरवर्षी साहित्य-संमेलनात अश्लीलतानिवारणाचा ठराव मांडण्याच्या काही गृहस्थांच्या चिकाटीत झाला असो, तो कोठेही उगम पावला असला, व त्याला कशानेही महत्व प्राप्त झाले असले, तरी इतके मात्र खरे की, एकदा जोरात आलेल्या या वादविवादाचा काही तरी समाधानकारक निकाल लावणे आता अत्यंत आवश्यक होऊन बसले आहे. कारण, उलटपक्षी, अश्लीलतेचा व अनीतीचा

# उपोद्घात.

नुकताच रोवला गेलेला खुटा हलवून बळकट केल्याचे श्रेय मात्र या वादापासून महाराष्ट्र-सरस्वतीचे पदरात पडणार असून, आज आपल्या समाजात जो बव्हंशी दबत दबत व काही अशी उघड असा अश्लीलतेचा प्रचार सुरू झाला आहे, त्याचे लवकरच अनीतीच्या पूर्णपणे उघड, निर्लज्ज व नग्न नाचात रूपांतर झालेले दिसून येईल. निरक्षर लोकांच्या अधर्माचरणापेक्षा साक्षर लोकांचे अधर्माचरण अधिक निंद्य, आणि त्यातही जर त्याला विद्वन्मान्यतेचा, किंवा नुसता विद्वन्नि-मूढतेचा देखील शिक्कामोर्तब मिळाला, तर मग 'आधीच मर्कट तशातहि मद्य प्याला' या न्यायाने त्याचे दुष्परिणाम किती भयंकर व दूरवर पसरणारे होतील याची कल्पनाच करणे बरे. यास्तव, महाराष्ट्र वाङ्मयास व सदभिरुचीस लागू पाहणाऱ्या या कीडीचा एव्हाच बीमोड व्हावा या हेतूने आपापल्यापरीने निःसंदिग्ध व निःपक्षपाती प्रयत्न करून, महाराष्ट्रशारदेवर होऊं पहाणाऱ्या या अश्लीलतेच्या व अनीतीच्या हल्ल्यापासून तिचे संरक्षण करणे, हे सर्व साहित्य-सेवकांचे एक आवश्यक व पवित्र कर्तव्य आहे यात तिळमात्र संशय नाही. आणि असा एक प्रयत्न ह्मणूनच पुढील प्रकरणे लिहिण्यात आली आहेत.

---

## प्रकरण पहिलें.

# कलेविषयीं सामान्य विवेचन.



कोणत्याही वादग्रस्त विषयाच्या विचारास सुरवात करण्यापूर्वी त्यांतील मुख्य महत्वाच्या पदाची व्याख्या करणें आवश्यक आहे, हे उघडच आहे. आणि या सामान्य नियमास अनुसरून कलोपासनेसंबंधीच्या या प्रस्तुत वादांत शिरण्यापूर्वी, कलेची योग्य व शास्त्रशुद्ध व्याख्या केली पाहिजे असा आग्रह धरणे अगदीच अयुक्तिक होणार नाहीं. परंतु सर्व शास्त्रांच्या अभ्यासाचे प्रारंभीं येणारी एक अडचण येथेही आपल्यापुढे उभी राहण्याचा संभव आहे. कोणत्याही शास्त्राचा जसा प्रारंभ तसाच शेवट देखील तत्प्रतिपाद्य विषयाच्या व्याख्येनें होत असतो. वरवर विसंगत दिसणारें हे विधान वास्तविक तसें नाहीं, कारण, प्रारंभीच्या व शेवटच्या व्याख्येंत वस्तुतः महदंतर असतें. प्रारंभीची व्याख्या ढोबळ मानानें केलेली असते, व तिचा उद्देश केवळ जिज्ञासूला त्या विषयाची जगांतील इतर विषयांपासून ओळख पटावी इतकाच असतो. ज्याला पद्य ह्मणजे काय हेंच माहीत नाहीं तो वृत्तदर्पण काय शिकणार ? आणि ज्याला इतर वस्तूंपासून सुवर्ण नेमकें ओळखून काढतां येत नाहीं, तो सुवर्णकाराची कला अवगत तरी कशी करून घेणार ? उलट, शेवटची व्याख्या शास्त्रशुद्ध, अव्याप्तिअतिव्याप्ति

इत्यादि दोषापासून पूर्णपणें आलिप्त, व प्रतिपाद्य वस्तूच्या सर्व—व फक्त—"आवश्यक" गुणाचा निर्देश करणारी अशी असते. किंबहुना कोणत्याही शास्त्राचा उद्देश तत्प्रातिपाद्य विषयाची संपूर्ण व शास्त्रशुद्ध व्याख्या करणे हाच होय असे ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं. यासाठी कलेची आमच्या मते योग्य अशी व्याख्या वाचकास येथे प्रारंभीच देणे युक्त होणार नाहीं. कारण तसे केल्यास ज्या पुढे सिद्ध करावयाच्या आहेत अशा काहीं गोष्टी आधीच गृहीत धराव्या लागतील व वाचकाचा निरर्थक घोटाळा होईल. यास्तव सामान्यतः व्यवहारात या संबधात ज्या काहीं टोकळ व्याख्या प्रचलित आहेत त्याच्या परीक्षणापासूनच आपण या विषयास सुरवात केल्यास ते फार सोयीचे होईल.

सामान्य परिभाषेत आपल्यास कलेच्या मुख्यत्वेकरून दोन व्याख्या प्रचलित असलेल्या आढळून येतात. सौंदर्यसंपन्न वस्तु निर्माण करण्याची युक्ति ह्मणजेच कला, ही एक,* व मनाला आनंद देणारी प्रत्येक कृति व वस्तु कलापूर्ण ह्मटली पाहिजे ही दुसरी व्याख्या होय. थोडा अधिक

*"Now I believe Art cannot be better defined than as the creation or the expression of the Beautiful"—*Shakespeare His Life, Art and Characters*, by H N. Hudson, Vol I, pp 238-39 सामान्य मनुष्याच्या कलाविषयक कल्पनेबद्दल सुप्रसिद्ध रशियन लेखक टॉलस्टॉय लिहितो. "'Art is activity that produces beauty,' says such a man To him it seems clear and comprehensible that art consists in manifesting beauty, and that a reference to beauty will serve to explain all questions about art."—*What is Art,* chapter II.

विचार केला असता यातील पहिली व्याख्या दुसरीत समाविष्ट करता येईल; कारण सौंदर्य ह्मणजे तरी काय असा प्रश्न उपस्थित केला असता मनाला आनंद देण्याचा कोणत्याही पदार्थाचा गुण असेच उत्तर साधारण जनसमदाकडून दिले जाते. याशिवाय आणखीही एका दृष्टीनें प्रस्तुत ठिकाणी या दुसऱ्या व्याख्येला महत्व प्राप्त झाले आहे. नीति व कला याचा वास्तविक पहाता मुळींच परस्परसबध नाही असे निश्चितपणे प्रतिपादन करणाऱ्या लोकाकडूनही हीच व्याख्या अधिक प्रामुख्यानें पुढे केली जाते. नीतिअनीतीच्या झगड्यात पडण्याचे कलाकाराला कारण नाही, त्याने आपल्या कृतीपासून लोकाच्या व स्वतःच्या मनाला आल्हाद होईल किंवा नाही, इतके पाहिले म्हणजे पुरे, असे या लोकाचे म्हणणे असते. अतएव आपण येथें तूर्त या दुसऱ्या व्याख्येचाच चिकित्सापूर्वक विचार करू.

इतर कोणत्याही तत्सदृश विषयाप्रमाणे, कलेच्या व्याख्येंतच आपल्यास तिच्या ध्येयाचाही सुगावा साहाजिकच लागू शकेल. मनाला आनद देणारी प्रत्येक कृति व वस्तु कला या सदराखाली येते, असे म्हणणाऱ्याचे मताने कलेचें ध्येय मनास आनद देणे इतकेच आहे, हे उघड आहे. परतु येथे एक महत्वाचा प्रश्न उपस्थित होतो. जगात मानवी मनात निर्माण होणाऱ्या आनद या सदराखालील सर्व अतःकरणवृत्ति एकाच प्रकारच्या आहेत काय ? जगातील कोणत्याही दोन अगर अधिक आनंदी मनोवृत्ति घेतल्या, तर त्यातील फरक केवळ कमीअधिकपणाचा-संख्येचा-च असू शकेल, किंवा जातीचा देखील असू शकेल ? आणि जर सुखात अगर आनंदांत असा प्रकारभेद असेल तर कोणत्या विशिष्ट प्रकारच्या आनदाचे

जनकत्व कलेकडे दिले पाहिजे ? किंवा, सरसकट सर्वच आनंदाचें जनकत्व कलेकडे देणे इष्ट आहे ?

हे दोनही प्रश्न बरेच वादग्रस्त आहेत, व विशेषतः पहिल्यावर तर नीतिशास्त्रात आजपावेतो बरींच रणे माजली आहेत. परंतु या प्रश्नाच्या तपशिलात शिरणें आपल्यास येथे शक्यही नाही, व फारसे आवश्यकही नाही. पहिल्या प्रश्नाचे थोडक्यात असे उत्तर देता येईल की, जगातील सर्व सुखे एकाच प्रकारची नसून त्यामध्ये प्रकारभेद मानणे आवश्यक आहे. कारण, सर्व सुखे एकाच प्रकारचीं असून त्यामधील भेद जर केवळ कमीअधिकपणाचाच असता, तर एका विशिष्ट स्थितीत दुसरीपेक्षा उघड उघड अधिक सुख दिसत असता, कोणीही त्या दुसऱ्या स्थितीस पतकरले नसते. परंतु, जगात वास्तविक आपल्याला याच्या उलट स्थिति अनेक वेळा दृष्टोत्पत्तीस येते.* दरिद्री ज्ञानी मनुष्याला श्रीमंतीत लोळणाऱ्या व प्रकृति उत्तम असणाऱ्या पण अत्यंत अज्ञानी मनुष्यापेक्षा अधिक सुख असते काय ? पण मग

*पहा. "पशूला जें जें सुख उपभोगणे शक्य आहे तें तें सर्व तुला देतो असें सांगून कोणास "तूं पशु होण्यास राजी आहेस काय ?" असा प्रश्न केला तर एक देखील मनुष्य पशु होण्यास तयार होणार नाही"—लो. टिळक कृत "गीता रहस्य," पृ. ९२. तसेंच "Few human beings would consent to be changed into any of the lower animals for promise of the fullest allowance of a beast's pleasure"—*Utilitarianism* by J. S. Mill. मानवी जीवनाचें अंतिम ध्येय केवळ सुख हेंच आहे असें म्हणणाऱ्या या उपयुक्ततावादी इंग्रज तत्वज्ञान्याला याच कारणामुळे शेवटीं सुखांत प्रकारभेद मान्य करून स्वतःच्या प्रतिपादनांत परस्पर विसंगति उत्पन्न करणे भाग पडले.

तो ज्ञानी मनुष्य आपली स्थिति सर्वस्वी टाकून त्या अज्ञानी बहुसुखी मनुष्याची स्थिति पतकरण्यास का बरे तयार होत नाही? एक जुलमी सत्ताधीश सत्य व स्वातंत्र्याप्रीत्यर्थ जीविताचा होम करण्यास तयार झालेल्या राष्ट्रवीरास हाल हाल करून ठार मारीत आहे अशी कल्पना करा. आता या वेळेस कोणाची स्थिति अधिक दुःखप्रद आहे व कोणाची सुखप्रद आहे हे स्पष्टपणे सांगावयास पाहिजे काय? पण असे असताही ते दोघे आपापल्या जागा बदलण्यास का बरे तयार होत नाहीत? त्यातील जुलमी मनुष्य या अदलाबदलीस तयार होणार नाही यात आश्चर्य नाही; परंतु, त्या दुसऱ्या स्वार्थत्यागी व्यक्तीनेही यासाठी तयार होऊ नये, यात महदाश्चर्य नव्हे काय? एखादा जातिवंत उच्च दर्जाचा कलाकार श्रेष्ठ अशा कलानिर्मितीतील स्वर्गीय आनंद सोडून क्षुद्र विषयानंदाच्या अतिमोठ्या संचयाकडे देखील वळेल काय? या सर्व उदाहरणावरून एकच गोष्ट उघड होते की, आनंद या सदराखाली येणाऱ्या सर्व मनोवृत्ति एकाच जातीच्या नसून त्यात प्रकारभेद आहेत. काहीं आनंदवृत्ति जात्याच उच्च प्रकारच्या असतात, तर काहीं हलक्या प्रकारच्या असतात. असें मानल्यावाचून आपल्यास वरील कोड्याचा उलगडा होत नाहीं.

*"I have already endeavoured to show that, when we pronounce one pleasure higher than another, we mean that, though both of them are pleasant—it may be equally pleasant—the one is more valuable than the other for some other reason than its pleasantness I may say to myself in a certain mood 'I should get more pleasure from going to this farce than I should from going to that tragedy', and yet I may say to myself 'The tragedy is the nobler and higher pleasure, therefore to the tragedy I will go' "—*The Theory of Good and Evil* by Hastings Rashdall, Vol II, *pp.* 31-33

आनदाच्या या दोन प्रकारामधील बारीक भेदात शिरण्याचें आपल्यास येथे कारण नाही; आपल्या प्रस्तुतच्या विषयास आवश्यक इतकाच भेद येथे दाखविला म्हणजे पुरे. आणि तसे पाहू गेले असता अश्लील अनीतीच्या उथळ सौंदर्यापासून उत्पन्न होणारा हीन आनंद (कोणी कोणी तर त्याना केवळ सौंदर्याभास आणि आनदाभासच म्हणतील*), आणि सात्विक सौंदर्यापासून उत्पन्न होणारा उच्च कोटीचा व उन्नतीप्रत नेणारा "ब्रम्हास्वादसहोदर" आनद यातला फरक कोणत्या सूज्ञाला अवगत नाहीं ?† एक पापापासून उत्पन्न होतो तर दुसरा उच्च पुण्यकृत्यात उगम पावतो. एक शाश्वत असतो तर दुसरा क्षणिक असतो. पण यातील मुख्य भेद शाश्वत व क्षणिक या शब्दानी चागल्या तऱ्हेने व्यक्त होत नाही. कारण, कित्येक प्रसगी उपर्निर्दिष्ट उच्च कोटीच्या एखाद्या आनदापेक्षा दुसऱ्या कोटीतला आनद वर वर पहाणाऱ्या दृष्टीला तरी काहीं काळ अधिक टिकलेला या जगात आढळून येतो. यासाठी त्यातील महत्वाचा व मुख्य भेद आपण येथें लक्षात ठेवला पाहिजे, तो हा की, वर ज्याला हलक्या प्रतीचा आनंद असे संबोधिले आहे त्यात स्वतःतच त्याच्या नाशाचे व भावी दुःखाचे बीज अतर्भूत असते. ते बीज आज, उद्या, पर्वा,

* उदाहरणार्थ, प्रो. अळतेकर एके ठिकाणी काय ह्मणतात पहा: " अनीतीचें सनिधान असलेले सौदर्य, सौदर्य नसून सौंदर्याचा भास असतो व तेथे खरोखर असुदरतेने कृत्रिम उपायानी सौदर्याचे सोग आणलेले असते. " ( ' पारिजात ' फेब्रुवारी १९३४, पृष्ठ ५१ )

† " The artist's pleasure is not the pleasure of the voluptuary but a specifically aesthetic pleasure "— *Outlines of a Philosophy of Art* by Collingwood, p 11.

अगर अधिक कालांतराने फळल्यावाचून रहात नाही. उलट उच्च कोटीच्या आनंदात असे दुःखबीज लपलेलें नसते, म्हणूनच तो खरा आनंद, व पहिला केवळ आनंदाभास होय असे कित्येकांचे म्हणणें आहे. उच्च कोटीचा आनंद एकदा प्राप्त झाला म्हणजे त्याच्यानंतर दुःखानुभव येणार नाहींच असे नाही. परंतु या नंतरच्या दुःखाचा संबंध त्या आनंदाशीं नसून, इतर एखाद्या घटनेशीं असतो. शिवाय, उच्च कोटीच्या आनंदाचा विषय प्रत्यक्ष सृष्टींतून नाहीसा झाला तरी त्याची नुसती स्मृति देखील आनंददायक असते. उलट, दुसऱ्या प्रकारच्या आनंदाची कालांतरानें स्मृति झाली असतां, ती दुःखकारक, तापदायक, व कित्येक प्रसंगीं तर लज्जास्पद देखील असेत. किमानपक्षी त्यातील आनंद पूर्वीपेक्षा फार कमी होत जातो यात संशय नाही.

येथे जाताजाता एका आक्षेपाचा विचार केल्यास चांगलें होईल. आनंदाचे जे वर प्रकारभेद केले आहेत त्यावर कोणी अशी शंका घेतील की, वास्तविक पाहातां आनंदमनोवृत्ति ही सर्व-ठिकाणी व सर्वकाळी एकाच प्रकारची असून, तिच्यात जो उच्चनीच-पणाचा भेद दिसतो तो तिच्या विषयांतर्गत उच्चनीचपणामुळे तिच्यांत शिरतो. या आक्षेपांत कांहींसे तथ्य आहे हे आम्ही कबूल करतो. परंतु आमचे म्हणणे इतकेंच की, हा आक्षेप जीवनाचे अंतिम ध्येय निश्चित करूं पहाणाऱ्या एखाद्या केवळ नीतिशास्त्रावरील पुस्तकांत कितीही महत्वाचा असला, तरी कला व नीति यांच्या संबंधाच्या प्रस्तुत वादांत त्याला कांहीच महत्व नाही. कारण, आनंदातील उच्चनीचपणा अशा रीतीने वास्तविक त्याच्या विषयांत आहे असें

मानले तरी आमच्या मुख्य प्रमेयाला मुळीच बाधा न येता, कलेचें ध्येय सात्विक आनद उत्पन्न करणे हे आहे, या आमच्या विधानाला ‘ व हे ध्येय कलेचे विषय सात्विक, नैतिक व उच्च प्रकारचेच ठेवल्याने प्राप्त होईल ’ अशी पुष्टि जोडली कीं झालें. एवंच, उच्चनीचत्व वास्तविक आनंदात आहे असे मानले काय, किंवा विषयात आहे असे मानले काय, कला व नीति याचा संबंध सुटत नाहीं हे उघड आहे.

परंतु, याशिवाय येथे दुसरीही एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. केवळ आनंद ही मनोवृत्तीची एक जाति या दृष्टीने विचार केल्यास ही जाति सर्वदूर सारखी असेल. परतु प्रत्यक्ष व्यवहारात आपल्याला अशा या समष्टिरूप आनदजातीचा अनुभव कधीच येत नाही. जसे सर्व गायींत गोत्वजाति एकच असली तरी प्रत्यक्ष व्यवहारात ही नुसती गोत्वजाति आपल्यास कधींच उपलब्ध होऊ शकत नाहीं, उलट निरनिराळ्या अनेक गुणाचे संमिश्रण होऊन व्यक्तिरूप बनलेल्या गायीच दिसतात, त्याचप्रमाणे केवळ आनंदजातीचा आपल्यास प्रत्यक्ष अनुभव कधीच न येता त्यात समाविष्ट होणाऱ्या व्यक्तिरूप आनदवृत्तींचाच अनुभव आपल्यास नेहमी येतो. आणि या व्यक्तिरूप आनंदमनोवृत्तींत विषयांचा समावेश होत असल्याने त्याचे प्रकारभेद होऊं शकतात. कोणीही ‘ मला नुसता आनंदाचा अनुभव झाला, त्याला विषय नव्हता, साराश, तो कशापासूनही झाला नव्हता ’ असे म्हणूं शकत नाहीं; तर ‘ मला अमक्या गोष्टीपासून आनद झाला ’ असेच त्याला म्हणावे लागेल. प्रत्यक्ष अनुभवास येणाऱ्या सर्व आनदमनोवृत्तीत अशा रीतीने विषयांचा

समावेश होत असल्याने, व ह्याना उद्देशूनच आमचे प्रस्तुतचे विवेचन असल्याने, आम्ही वर आनंदाचे प्रकारभेद मानिले आहेत. हीच गोष्ट आधुनिक पाश्चिमात्य नीतिशास्त्रवेत्याच्या पद्धतीस अनुसरून सागावयाची झाल्यास ' जगात सुख एकाच प्रकारचे आहे, परतु सुखे अनेक प्रकारची आहेत ' असे वरवर विरोधी भासणारे परतु अतर्यामी सत्य असलेले विधान करता येईल.

असो. आता या दोन प्रकारच्या आनदवृत्तीपैकी कोणत्या प्रकाराशी कलेची कल्पना निगडित झाली आहे हे स्पष्टपणे सागावयास पाहिजे काय ? कलेचे जन्म व पर्यवसान उच्च कोटीच्या, सात्विक, शाश्वत, एकजिनसी––ज्यात दुःखबीजाची भेसळ नाही अशा, व उन्नतीप्रत नेणाऱ्या आनंदातच झाले पाहिजे यात आम्हाला मुळींच सशय नाही उलट प्रकारच्या आनंदाशी कलेचा सबंध आहे असे म्हणणारा कोणी सुज्ञ असेल असे वाटत नाही. कलेचा एक विशिष्ट प्रकार जो काव्यलेखनकला त्याविषयी सुप्रसिद्ध साहित्यसेवक कै. वा. गो. आपटे लिहितातः " काव्यवाचनापासून होणारा आनंद शुद्ध व उच्च प्रतीचा आनद पाहिजे. काव्यात माणसाला पशुत्व देणारा व त्याला अधोगतीला नेणारा आनद नसावा एवढी खबरदारी मात्र अवश्य घेतली पाहिजे. " * समर्थ रामदास स्वामींची काव्याची व्याख्या तर सुप्रसिद्धच आहे. " कवित्व असावे रम्य गोड " असे सागून " मृदु मजुळ कोमळ । भव्य अद्भुत विशाळ । गौल्य माधुर्य रसाळ " अशी काव्याचे आनंदजनकत्व दाखविणारी विशेषणे

*" लेखनकला " पृ. ६९ शिवाय " सौंदर्य आणि ललितकला " पृ. १८–२२ पहा

दिल्यानंतर समर्थ लागलीच पुढील ओव्या लिहिण्यास विसरले नाहीत. " जेणे अनुताप उपजे । जेणे लौकिक लाजे । जेणे ज्ञान उमजे । या नाव कवित्व ॥ जेणे देहबुद्धि तुटे । जेणे भवसिधु आटे । जेणे भगवत प्रगटे । या नाव कवित्व ॥ "* साहित्यात अश्लीलतेचे एक मोठे आश्रयस्थान म्हणजे विनोद. या विनोदाबद्दल एक विद्वान लेखक म्हणतात " विनोद सात्विक व शुद्ध असावा... अपवित्र झालेला विनोद, मग तो शब्दाची कितीही गोड कसरत करून व्यक्त केलेला असला तरी हीनच म्हणावा लागेल, आणि अशा विनोदामुळे हसून मुरकुंड्या वळतात अशी कोणी त्याची जरी अज्ञानाने वाखाणणी करीत असेल तरी जाणत्यानी त्यासबंधी सत्य कल्पना निर्विकारपणे प्रसृत केली पाहिजे."† कलेच्या आनदाच्या शाश्वततेबद्दल एक इंग्रज ग्रथकार लिहितो, " And men of culture and judgment in that line naturally feel, in general, that a work of art which is not worth seeing many times is not worth seeing at all, and if they are at first taken with such a work, they are apt to be ashamed of it afterwards, and to resent the transient pleasure they found in it, as a sort of fraud upon them. In other words, Art aspires to interest permanently, and even to

* श्रीमद्दासबोध १४।३।३६-५०.

† शि गो. भावे कृत " गडकऱ्याचा विनोद " पृष्ठें १७-१८.

be more interesting the more it is seen."* अगदी असेच उद्गार श्रेष्ठ कवि व रसज्ञ मोरोपत यानीं आपल्या 'केकावलींत' भगवत्कथेस उद्देशून काढले आहेत. ते म्हणतातः

तुम्ही बहु भले, मला उमज होय ऐसें कथा,
कसा रसिक तो ? पुन्हा जरि म्हणेल आली कथा,
प्रतिक्षण नवीच दे रुचि, शुकाहि संन्यासिया,
न मोहिति भवत्कथा अरसिका अधन्यासि या ॥
कथा श्रवणचत्वरी जरि पुनः पुन्हा ये, रते—
महारसिक तद्रसीं, विटति ऐकता येर ते, †

सुप्रसिद्ध आंग्ल कवि कीट्स् याची "A thing of beauty is a joy for ever, its loveliness increases, it will never pass into nothingness" ही अत्यंत प्रसिद्ध उक्ति देखील हेच सागते. त्याचप्रमाणे कलेपासून होणारा आनद केवळ 'अनुकूल-सवेदना' या सदराखाली न येता, त्याने धार्मिक व नैतिक मानसोन्न-तीसही कारणीभूत झाले पाहिजे, या आमच्या विधानास पुष्टिकारक म्हणून उपर्निर्दिष्ट आंग्ल ग्रथकाराचीच पुढील सुदर वाक्ये येथें उद्धृत करण्यास हरकत नाही.तो लिहितोः— "But Art has its dangers as well as its uses: especially it is apt to degenerate from a discipline of religious

*Shakespeare His Life, Art and Characters, by Hudson p 131

†केकावली श्लोक १००-१०१. येथे इतके लक्षात घेतल्यास चागले होईल की या श्लोकात मोरोपत त्याच गोष्टीचे पण कलाकृतीच्या ऐवजी रसिकाच्या दृष्टीने प्रतिपादन करीत आहेत

virtue into a mere relaxation, losing the severity that elevates and purifies, in what is merely pretty or voluptuous or pleasing. " जी गोष्ट कलेच्या आनदाची तीच तिच्या सौंदर्याची. "Indeed the beauty ( if it be not a sin to call it such ) that sacrifices or postpones truth to pleasure is not good,......nor can I deem our case a very hopeful one when we surrender ourselves to that style of beauty which pleases without chastening the soul. For it is but too certain that when Art takes to gratifying such an unreligious taste, and so works its forces for the pleasing of men without touching them with awe, it becomes no better than a discipline of moral enervation. " * प्रसिद्ध आंग्ल लेखक बेकन् यानें देखील हीच गोष्ट पुढील सुन्दर वाक्यात सांगितली आहे. " Beauty, if it light well, maketh virtues shine, and vices blush. "† आणि जगप्रसिद्ध आधुनिक कविसम्राट् रवींद्रनाथ ठाकुर यांनीं तर स्पष्टच म्हटले आहे की, " जें खरोखर मगलमय तेंच सौंदर्य. सौंदर्य-मूर्ति हीच पूर्ण मंगलाची मूर्ति व मंगलमूर्ति हीच सौंदर्याचे पूर्ण स्वरूप. सत्य हेच सौंदर्य आणि सौंदर्य हेच सत्य. " ‡ जर्मन् तत्वज्ञ

* Hudson ( *op cit.* ) pp. 136-137.

† *Essays*

‡ पहा. वा. गो. आपटे कृत " सौंदर्य आणि ललितकला ", पृष्ठ १०.

कँट याने देखील आपल्या सौंदर्यविषयक ग्रथात ह्याच लक्षणाचे प्रतिपादन केले आहे.

असो. येथपावेतो आपण कलेचे ध्येय सात्विक, शुद्ध व उच्च कोटीचा आनंद उत्पन्न करणे हेच होय हे पौर्वात्य व पाश्चिमात्य देशातील मोटमोठ्या लोकाच्या विधानाच्या आधारे टरविले. परतु याच गोष्टीचा आपल्यास एका निराळ्या व स्वतत्र दृष्टीनेही विचार करिता येईल. कलेचे ध्येय केवळ आनदोत्पत्ति इतकेच नसून सात्विक, शुद्ध व उन्नतिप्रत नेणारा आनद निर्माण करणे हे आहे, या विधानाबद्दल सशय बाळगणाऱ्यानी पुढील विचारसरणीकडे लक्ष द्यावे. ज्या एकंदर मानवी जीवनाचे कला हे एक अग आहे, त्या मानवी जीवनाचे तरी ध्येय काय आहे ? केवळ अनुकूल संवेदना या सदराखाली येणारे सुख अधिकात अधिक कसे प्राप्त करून घेता येईल हाच मानवी जीवनाचा अतिम प्रश्न आहे काय ! सुदैवाने या वादाच्या तपशिलात शिरण्याची आता फारशी गरज उरलेली नाही. कारण, अशा प्रकारच्या ध्येयाचे प्रतिपादन करणारा केवळ सुखवादी सूज्ञ आता कोणी असेलसे वाटत नाही. अनेक वर्षेपावेतो चाललेल्या वादविवादाकडे पहाता, मनुष्याच्या अंतिम ध्येयात केवळ आनद हा एकच घटक नसून नीतीचाही त्यात समावेश केला पाहिजे, ह सिद्धात आता बहुतेक सर्वमान्य झाला आहे असे म्हणण्यास फारश हरकत नाहीं. आणि इतक्यावरही ज्याना ही गोष्ट पटली नसेल त्याच्याशी वादविवाद करणेच एका दृष्टीने व्यर्थ आहे; कारण ज्यान मानवी जीवनाच्या अंतिम ध्येयातच नीतीचे निःसंदिग्ध अस्तित्व मान्य नाहीं, त्याना कलेतच काय पण या विश्वात कोठेही नीतीचे

अस्तित्व खात्रीलायक रीतीनें पटविणे अशक्य आहे. आमच्या हिंदु-धर्मशास्त्रात तर या अंतिम ध्येयाचें वर्णन स्पष्टपणे सत्यम् , शिवम् आणि सुंदरम् , किंवा सत्, चित् आणि आनंद असे केलेले आहे. आणि कित्येक पाश्चिमात्य विद्वान देखील आपली ध्येयाची कल्पना अशीच करताना आढळून येतात. उदाहरणार्थ, सौंदर्यशास्त्राचा ( Aesthetics ) आद्य संस्थापक बॉमगार्टन् ( Baumgarten ) याच्या मताने अंतिम पूर्णतत्वाचे (The Perfect or Absolute) इंद्रियानी ग्रहण केले म्हणजे त्याला सौंदर्य [ Beauty ] म्हणावे; त्याच अंतिम तत्वाचे बुद्धीनें आकलन केले म्हणजे त्याला सत्य [Truth ] म्हणावे; व त्यालाच नैतिक इच्छाशक्तीनें [Moral will] प्राप्त करून घेतले म्हणजे शिवम् [ Goodness ] म्हणावे. सुप्रसिद्ध जर्मन् तत्ववेत्ता हेगेल् ( Hegel ) याच्या मतानेही सौंदर्य व सत्य ही दोन्ही जगाच्या बुडाशी असलेल्या एकाच अंतिम तत्वाची —ज्याला तो Absolute Idea असे संबोधितो—निरनिराळी रूपें आहेत; सत्य हे त्याचे मूळस्वरूप असून तेच सत्य बाह्यरूपाने प्रगट होऊन इंद्रियाना दृग्गोचर झाले म्हणजे त्याला सुन्दर असे म्हणतात. * सारांश, मानवी जीवनाच्या अंतिम ध्येयात आनंदाचे अस्तित्व आहे ही गोष्ट जरी निर्विवाद असली, तरी त्याचबरोबर तो आनंद सत्य किंवा नीति यापासून उत्पन्न झालेला, व म्हणूनच सात्विक, नैतिक, व शुद्ध असा आहे हे विसरता कामा नये. ब्रह्मप्राप्तीपासून

* अगदी अलीकडील आंग्ल नीतिशास्त्रवेत्ता Hastings Rashdall याचे मतही या बाबतीत या सारखेच आहे त्याच्या *Theory of Good and Evil* ( vol. I ) या पुस्तकाचें सातवे प्रकरण पहा.

होणारा आनंद जर विषयानंदाहून भिन्न कोटीचा नसता, तर ' तूं ब्रह्मज्ञानाचा मार्ग सोड, मी तुला विषयानंदाच्या अव्याहत प्राप्तीचा वर देतो ', असे एखाद्या ज्ञानेच्छूस देवाने म्हटल्यावर त्याने ब्रह्मज्ञानाचा मार्ग सोडावयास पाहिजे. परंतु ब्रह्मज्ञानजन्य शुद्ध आनंदाची ज्याला थोडीही चव कळली आहे, असा एखादा ज्ञानी पुरुष असे करण्यास स्वप्नातही तयार होईल काय ?*

मानवी जीवनाचे ध्येय सात्विक व शुद्ध आनंद प्राप्त करून घेणें हे आहे ही गोष्ट स्पष्ट झाली म्हणजे साहजिकच कलेच्या ध्येयाचाही प्रश्न सुटतो. एकदर मानवी जीवनाचे जे ध्येय तेच त्यात समाविष्ट झालेल्या त्याच्या निरनिराळ्या अगांचेही असले पाहिजे हे उघड आहे. यासाठी कला ही मानवी जीवनाच्या कक्षेच्या मुळी बाहेरच आहे, असे म्हणणाऱ्या आततायी वाद्याची गोष्ट वगळल्यास, इतर सर्वांना कलेचे ध्येय सात्विक आनंदाची प्राप्ति हेच आहे हे मान्य करावे लागेल.† आता असें पहा की, कोणत्याही कृतीचा परिणाम

*कठोपनिषदातील नाचिकेताची प्रसिद्ध गोष्ट पहावी.

†कला ही कलेसाठीच असून स्वतःच्या कक्षेबाहेर तिचा संबंध अगर उद्देश पोचत नाही, इत्यादि विधाने पुढे करून कलेची व एकदर मानवी जीवनाच्या नैतिक ध्येयाची फारकत करू इच्छिणाऱ्यांनी पुढील वाक्ये अवश्य वाचावींत " There is therefore no such thing as this life of pure imagination which is the life of art. Art is not a life but a subordinate element or phase in a life which is indissolubly one, the unitary life of the spirit Hence art always has its centre of gravity outside itself It is not a self-contained and self-sufficient activity, but a mere segment of that trajectory which is the spiritual life as a

कर्त्यास व भोक्त्यास अंतिम ध्येयाकडे घेऊन जाणे, त्यापासून दूर नेणे, व जेथल्या तेथेच ठेवणे, या तिघापैकी कोणता तरी एक झालाच पाहिजे हे उघड आहे. वास्तविक आम्हाला यातील तिसऱ्या पथाचें अस्तित्व मान्य नाही व आम्ही तसें लवकरच दाखवू देखील, परंतु काही लोकाना ते मान्य असल्याने आम्हीही सुरुवातीस ते मान्य करूनच चालतो. आता अंतिम ध्येयाच्या जवळ घेऊन जाणे म्हणजे उन्नति करणे—हीच नीति होय; व त्यापासून दूर नेणे म्हणजे अवनति करणे—हीच अनीति होय. आता राहिला तिसरा परिणाम. तो म्हणजे इकडे अगर तिकडे, उन्नतीकडे अगर अवनतीकडे, कोणीचकडे न हालता जेथल्या तेथेच रहाणे. पण याचेच नाव व्यर्थ कालक्षेप करणे ! आणि ईश्वरानें आपल्याला नेमून दिलेल्या मोजक्या कालक्षणाचा काहीच उपयोग न करता व्यर्थ क्षेप करणे, ही एक अवनतीलाच नेणारी गोष्ट नव्हे काय ? आपल्या वेळेचा काही तरी योग्य उपयोग करण्यास आपण बाधलों गेलो नाहीं काय ? जर असली ही विश्रांति योग्य कारणासाठी व योग्य कालापावेतोच असली, तर तिचा समावेश पहिल्या परिणामात होईल, कारण, सर्व योग्य विश्रांति उन्नतीलाच कारणीभूत होत असते. आणि जर ती केवळ

whole The attempt at a self-contained life of art is therefore of necessary futile An art which hugs itself in the conviction of its own self-sufficiency and pretends to exist for its own sake is an illusion, and can only end by becoming invertebrate and unproductive"—*Outlines of a Philosophy of Art* by Collingwood pp 95-97. ( See also p 8 para 3 ) याच संबधात टॉल्स्टॉयच्या *What is Art ?* या पुस्तकाचे पृ. १२० पहा.

आळसजन्य, अज्ञानजन्य, किंवा इतर एखाद्या अयोग्य प्रकारची असेल, तर तिचा परिणाम दुसऱ्या परिणामात समाविष्ट होईल. एवंच आम्ही वर म्हटल्याप्रमाणे, शेवटी दोनच परिणाम शिल्लक राहतील---उन्नति अगर नीति; आणि अवनति अगर अनीति. आता कोणत्याही कलाकृतीचा परिणाम तिच्या कर्त्याला व भोक्त्याला अंतिम ध्येयापासून-म्हणजेच वर सांगितल्याप्रमाणे नैतिक, सात्विक, शुद्ध आनंदापासून-दूर नेणे हा असावा काय ? या प्रश्नाला स्पष्ट नकार देण्याची आवश्यकता आहे असे आम्हास वाटत नाही. कारण जो या प्रश्नाला होकारार्थी उत्तर देईल, त्याला कला व कली यातलाच भेद कळला नाही, असे प्रो. वामनराव जोशी यांच्या कोटीचा अवलंब करून म्हणता येईल. अर्थातच प्रत्येक कलाकृतीचे ध्येय व तिचा परिणाम मानवी मनात सात्विक आनंद उत्पन्न करणेंच होय हे सिद्ध झाले.

प्रत्येक कलेचें साध्य कर्त्याच्या व भोक्त्याच्या मनात शुद्ध, सात्विक व नैतिक आनंद उत्पन्न करणे हेच होय असे एकदा मान्य केले, म्हणजे नीति व कला यांचा किती निकटचा संबंध आहे हे तेव्हाच लक्षात येईल. कारण, कलाकृति निर्माण होत असताना जर नीतीकडे योग्य लक्ष दिले गेले नाही, तर कलेपासून उत्पन्न होणारा आनंद सात्विक व शुद्ध राहणार नाही. " नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः " या सुप्रसिद्ध भगवदुक्तीचा थोड्या निराळ्या संदर्भास अनुसरून अर्थ लावून असे म्हणता येईल की, कलेच्या उगमस्थानात व नंतर ती पूर्णत्वास प्राप्त होत असताना योजलेल्या निरनिराळ्या साधनात जर नीतीचा अभाव असला, तर तिच्या पर्यवसानावस्थेत नीतीचे अस्तित्व सापडणे अशक्य आहे; व उलट,

त्यात जर कोठेही अनीति असली तर तितक्याच प्रमाणात ती शेवटी देखील राहिलीच पाहिजे—तिच्या अस्तित्वाचा परिणाम तिच्या अभावात होऊं शकणार नाही. सुप्रसिद्ध संतशिरोमणि तुकोबा याचें 'शुद्ध बीजा पोटीं, फळें रसाळ गोमटीं' हे सुंदर व सर्वसंमत विधान इतर सर्व बाबींप्रमाणे याही बाबतींत खरें ठरलें तर त्यात नवल कोणतें ?

---

# प्रकरण दुसरें.

## परिवर्तनशील व शाश्वत नीति.



मागील प्रकरणात आपण कलेच्या ध्येयाचे व तदनुषगाने तिच्या सामान्य स्वरूपाचे थोडेसे विवेचन केले. आता कला व नीति याच्या परस्पर सबधाच्या विवेचनात अधिक खोल रीतीने शिरण्यापूर्वी नीतीबद्दल थोडा विचार करणे आवश्यक आहे. वरील विवेचनात वाचकास हा शब्द पुष्कळ वेळा आढळून आला असेल, व कलेसंबधीच्या यापुढील विवेचनात तर तो आणखी कित्येक प्रसगी येणार आहे. यास्तव प्रथम या पदाचे या प्रकरणात आवश्यक तितके स्पष्टीकरण करून, नतरच कलेचा नीतीशी असलेला निकटवर्ति सबंध स्पष्ट करणे सयुक्तिक होईल.

येथे प्रथमदर्शनीच आपल्यापुढे विरुद्ध पक्षाकडून एक आक्षेप आणला जातो, तो असा की, या जगात शाश्वत अगर सनातन नीति अशी मुळीच नसून, नीति ही कालानुसार व देशानुसार रंग पालटणारी आहे. कारण, जी गोष्ट एका कालात नीतीची ह्मणून समजली जाते तीच कालातराने अनीतीच्या अडगळयात फेकली जाते, व त्याचप्रमाणे एका देशातील लोक ज्या गोष्टीला अनीतीच्या सदरात घालतात, तिचाच त्याच कालात दुसऱ्या एखाद्या देशातील लोक नीतिमान

ह्मणून उदो उदो करीत असताना आढळून येतात. अस्पृश्यतानिवारण, सतीप्रतिबंधक कायदा, विधवाचा पुनर्विवाह, देवताकृपेच्या अपेक्षेने केलेली निरपराध मुक्या जीवाची हिंसा, इत्यादि अनेक धार्मिक व सामाजिक प्रश्नाबद्दल आढळून येणारा भिन्न भिन्न मताचा गलबला वरील आक्षेपाच्या पुष्ट्यर्थ पुढे करण्यात येतो. आणि अशा प्रकारे त्रिकालाबाधित नीतीचे अस्तित्व नाकारून, हे आक्षेपक असा आव आणतात की, जरी कलेने नीतीच्या बंधनात रहावे असे एक वेळ मान्य केले तरी, शाश्वत, सर्व देशात व कालात मान्यता पावणारी अशी नीति तरी कोठे आहे कीं, जिच्या अनुरोधाने कलावतानें आपली कृति निर्माण करावी ? असाच एक आंग्ल आक्षेपक ह्मणतो:— "Sincerity we may demand from the artist but not truth, for who knows what is truth outside the narrow limits of mathematical science ?"* सुप्रसिद्ध मराठी लेखक श्री. वि. स. खांडेकर यानीही नुकतेच " कला व नीति " या विषयावरील आपल्या एका व्याख्यानात पुढील उद्गार काढल्याचे प्रसिद्ध झाले आहे. " मानवी समाजाला उच्चत्वाला नेणारे नियम म्हणजे नीति असे सर्वसामान्यतः समजले जाते. परंतु हे नियम कालाच्या ओघाप्रमाणे बदलत असतात हें लक्षात ठेवले तर बरेच वाद कमी होतील. आज आपण ज्याला ' नीति ' समजतो, ती २५–३० वर्षांपूर्वी खास ' अनीतीत ' मोडली जात होती. ' चांगले ' आणि ' वाईट ' या कल्पना प्रत्येक पिढीत बदलत असतात.. ...बाह्य

* *The Rudiments of Criticism*, by E. A. G. Lamborn, p. 13.

वेषासंबंधी सभ्यतेच्या व शिष्टाचाराच्या कल्पना ज्याप्रमाणे आजच्या पिढीत बदलल्या आहेत त्याचप्रमाणे मानसिक नीतिकल्पनाही आता बदलल्या आहेत. "* परंतु, असल्या प्रकारच्या आक्षेपाचें एक सर्वांत उत्तम उदाहरण वाचकास रा. रा. भास्करराव ताम्बे यांच्या पुढील वाक्यांत सापडेल. ते लिहितातः "या जगात जिला आपण नीति ह्मणतो ती खरोखरच सत्यस्वरूप अशी कांहीं वस्तु आहे काय ? ......आज जी गोष्ट नीतीची आपण ह्मणतो तीच उद्या अनीतीची ठरते. एका देशात जी नीतिमत्ता समजली जाते तीच दुसऱ्या देशात अनीति मानण्यात येते. मग खरी नीति कोणती ह्मणायची ? **या जगांतील नीति अशी बहुरूपिणी आहे**........मग कलेनें कोणाला मान तुकवावी ? कोणाचा पक्ष धरावा आणि कोणाचा सोडावा ? कलेच्या क्षेत्रात हा वादाचा झगडा धुमाकूळ घालू लागला तर त्याला कंटाळलेल्या माणसाने शांतीसाठी कोणाला शरण जावे ? **खरें पाहूं जातां केवल नीति या जगांत नाहीच असे म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं.** नीतिखंड मात्र येथें दृष्टीस पडतात, ह्मणूनच **सरड्यासारखे नीति आपले रंग पालटीत असते.** अशा **अशाश्वत परिवर्तनशील नीतीचा** अवलंब कलेने केला **तर** नीतीचे तत्कालीन स्वरूप नाहीसें होताच **कला देखील नष्ट होईल.** "†

कला आणि नीति यांच्या परस्परसंबंधाच्या वादात हा आक्षेप इतका वारंवार व प्रामुख्याने पुढे केला जातो कीं, त्याचें विस्तृत खंडन करणे येथे आवश्यक आहे. आणि या संबंधात प्रथमदर्शनीच

* "साप्ताहिक ज्ञानप्रकाश" ता. २९ जुलै १९३४, पृष्ठ २

† "कला आणि नीति", पृष्ठे १६-१७ (जाड टाइप आमचा)

अशी तक्रार केली पाहिजे की, वरील आक्षेप पुढे करणारे बहुतेक वादी एका फार महत्वाच्या गोष्टीकडे हेतुपुरःसर अगर न कळत अक्षम्य दुर्लक्ष करीत असतात. वास्तविक या जगात सर्वच नीति अशाश्वत, परिवर्तनशील व सरड्याप्रमाणे क्षणोक्षणी रग बदलणारी असून त्रिकालाबाधित व सनातन अशी नीतितत्वे मुळी नाहीतच की काय, या महत्वाच्या प्रश्नाचा विचार थोडासा बाजूस ठेवून, आम्ही वरील आक्षेपकाना प्रथमच असा एक उलट प्रश्न विचारूं इच्छितो की, जो आक्षेप तुम्ही नीतीविरुद्ध पुढे करता, तोच कोणी कलेविरुद्ध पुढे आणू शकणार नाही काय ? तसे पाहू गेले असता, या विश्वातील प्रायः सर्वच वस्तु परिवर्तनशील आहेत, आणि या परिवर्तनशील व क्षणोक्षणीं बदलणाऱ्या बाह्य देखाव्याच्या बुडाशी दडून बसलेले— व तसे ते तेथे खात्रीने असलेले—शाश्वत व सनातन तत्व हुडकून काढणे हेच तत्वज्ञानाचे, शास्त्राचे, किबहुना मानवी जीविताचे कार्य होय. कलेसबधीच्या पाचशे वर्षापूर्वीच्या कल्पना आजही जशाच्या तशाच कायम आहेत असे छातीवर हात ठेवून म्हणण्यास रा. ताबे तयार आहेत काय ? किवा, पुढेही त्या कधी बदलणार नाहीत अशी हमी ते भरू शकतील काय ? अथवा, आज पाश्चिमात्य देशात एखाद्या कलेच्या आदर्श स्वरूपाविषयी ज्या काही कल्पना प्रचलित आहेत, त्याच कल्पना ततोततपणे इतर देशात देखील आहेत काय ? सुप्रसिद्ध अजंटाची लेणी, आग्र्याचा ताजमहाल, ईजिप्तचे मनोरे, इत्यादिकाना निर्माण करणारे कलावंत आणि त्याचप्रमाणे पाश्चिमात्य देशातील नामाकित शिल्पकार व चित्रकार याच्या सर्वाच्या मनात कलेविषयी अगदी एकसारख्याच कल्पना

व समजुती घोळत होत्या काय? यासंबंधांत कलकत्त्याच्या 'गव्हर्न्मेंट स्कूल् ऑफ् आर्ट्' चे विद्वान मुख्याध्यापक पर्सी ब्राउन् हे एके ठिकाणी पौर्वात्य व पाश्चिमात्य देशांतील कलांचे तुलनात्मक विवेचन करतांना लिहितातः "No true comparisons can be instituted between the art of the Orient and that of the Occident. Each starts from a different origin, aims at a different object, and arrives at a different end." * आदर्श नाटक, कादंबरी, निबंध, वगैरे संबंधींच्या कल्पना गेल्या पन्नास वर्षांतदेखील पुष्कळच बदलल्या आहेत ही गोष्ट खोटी आहे काय? "भौतिकता आणि वाङ्मय" या लेखांत रा. प्रभाकर पाध्ये यांनीं पाश्चात्य व पौर्वात्य वाङ्मयाचें सुंदर पर्यालोचन करून शेवटीं पुढील उद्गार काढले आहेतः "या विवेचनावरून हे ध्यानांत येईल कीं प्रत्येक कालखंडांतील वाङ्मयाचा दृष्टिकोन व दर्जा त्या त्या कालांतील भौतिक परिस्थितीवर अवलंबून असतो व त्या त्या कालांतील रूढ म्हणजेच राज्यकर्त्यांच्या मनोवृत्तीची कास धरतांना ते आढळते. जो नियम आपण सर्रहा वाङ्मयाला लावतों तोच नियम उत्कृष्ठ वाङ्मयाच्या दंडकांना लावतां येतो. मनुष्याच्या उत्कृष्ठ वाङ्मयाच्या कल्पना त्याच्या भौतिक जीवनाबरोबर बदलत असतात. निरनिराळ्या काळीं निरनिराळे दंडक प्रचारांत

**Indian Painting*, p 6 इतकेंच नव्हे, तर या शतकाच्या सुरुवातीपावेतों पौर्वात्य कृतींना कला या सदराखालीं घालण्यास देखील पाश्चिमात्य परीक्षक तयार नव्हते !

यांत संशय नाहीं. ही दुसरी पद्धति प्रसंगीं किती चुकीचे निर्णय देते, याचा सखंडन उत्तम महाराष्ट्रीय मासला पहावयाचा असल्यास, प्रथम विनोदाचे योग्य स्वरूप काय हें निश्चित केल्यानंतर त्याची कसोटी लावून कै. गडकऱ्यांच्या विनोदाचे मार्मिक परीक्षण करणारें, व ह्मणूनच गडकऱ्याना विनोदमहर्षि समजणाऱ्या सांप्रदायिकाच्या विधानातल्या चुका उघड करणारे, श्री. भावे याचे " गडकऱ्याचा विनोद " हे पुस्तक पाहावे.

परंतु, विवेचनपद्धतीबद्दलचा हा वाद बाजूस सारला तरी, श्री. तांबे यानी शेक्सपिअर, वर्डस्वर्थ्, मिल्टन् इत्यादिकाबद्दल काढलेला उपर्निर्दिष्ट निष्कर्ष सर्वथैव चुकीचा आहे असें आमचे स्पष्ट मत आहे. पण या सर्व कवींच्या बाबतीत त्याच्या विधानाचे सप्रमाण खंडण करणें येथे अर्थातच अशक्य असून, त्यानी स्वतःच ह्मटल्याप्रमाणे " ' शितावरून भाताची परीक्षा ' या न्यायानेंच याचा विचार करणे शक्य आहे " (पृ. ४). यासाठी उदाहरणादाखल आह्मी येथें शेक्सपिअरबद्दल त्यानीं केलेली विधाने कशी चुकीचीं आहेत हे दाखवूं; इतर कवीबद्दल वाचकानी स्वतःच योग्य ग्रंथ वाचून मत बनवावें.

श्रेष्ठ नाटककार शेक्सपिअरबद्दल श्री. तांबे काय म्हणतात पहाः " त्याचें कोणतेंही नाटक हातीं घ्या आणि मग पाहा की, आपल्या उत्तान भराऱ्या आणि उड्डाणात त्याने नीतीचें जड बोजके आपल्या पंखावर वाहून नेलें होते की काय ? यागोसारखा चांडाळ, गानरिल रेगनसारख्या राक्षसिणी, लेडी मॅक्बेथसारख्या पापिणी, शायलॉकसारखे नरमांसासाठीं टपलेले खुनी—यांसारखे अनेक

स्त्रीपुरुष आणि बहुधा यांचाच अंतीं जयजयकार. हें सारें नीति-प्रवर्तक होय असें म्हणणारास वेड लागलें आहे असेंच म्हणावें लागेल. " ( पृ. ४-५ जाड टाईप आमचा ).

आता शेक्सपिअरच्या नाटकाविषयीं आमचें स्वतःचें मत वरील विधानाच्या सर्वथैव विरुद्ध आहे इतकेंच न सागता, त्याच्या नाटकाच्या चिकित्सक अभ्यासाबद्दल ज्याची वाङ्मयक्षेत्रात प्रसिद्धी आहे अशा काहीं ग्रंथकाराची मतें आम्ही येथें उद्धृत करतो. त्यावरून वाचकानी श्री. ताबे याच्या दिशाभूलकारक विधानाची खरी किंमत ठरवावी.

" *Shakespearean Tragedy* "या पुस्तकाचा प्रसिद्ध लेखक ए. सी. ब्रॅडले लिहितो " ' The doer must suffer '—this we find in Shakespeare. *We also find that villainy never remains victorious and prosperous at the last* " ( pp. 31-32. Italics ours ). यातील दुसऱ्या वाक्याशी श्री. ताबे याचे ' बहुधा याचाच अती जयजयकार ' हे उद्गार ताडून पहावे ! " *Shakespeare His Life, Art and Characters* " या पुस्तकाचा कर्ता डॉ. हड्सन् स्पष्ट लिहितो: " For I run no risk in saying there is not a single instance in his plays where the feelings of any natural-hearted reader fail to go along with those who are, at least relatively, the best. " ( Vol. 1, p. 252. See also the next four sentences ). आणि हेच श्रेष्ठ कलेचें लक्षण नव्हे काय ? उत्तम कलाकृतींत दुर्जनांनीं पीडलेले सज्जन नसतात असें

नव्हे. परतु, त्यात इतकी कुशलता असते की, सर्वसाधारण जनतेची सहानुभूति क्षणमात्र विजयी दिसणाऱ्या दुर्जनाकडे न जाता शेवटी ती त्रस्त परंतु नीतिमान् व सज्जन अशा पात्राकडेच वळली पाहिजे. शेक्सपिअरच्या नाटकात क्वचित् ठिकाणी अश्लीलता आहे हें खरे आहे; परंतु, त्याच्या नाटकाचा एकदर रोख नीतिप्रवर्तक नाही असें म्हणणाऱ्यानीं सदरहू ग्रथकाराचेच पुढील अधिक निःसंदिग्ध उद्गार वाचावे. नीति व कला याचा निकट सबध आहे असे प्रतिपादन करून डॉ. हडसन् लिहितो: "Now I do not at all scruple to affirm that Shakespeare's poetry will stand the test of these principles better than any other writing we have outside the Bible. His rank in the school of Morals is indeed no less high than in the school of Art He is every way as worthy to be our teacher and guide in what is morally just and noble and right as in what is artistically beautiful and true. In his workmanship the law of moral proportion is observed with a fidelity that can never be too much admired; in other words, the moral element of the beautiful not only has a place, but is in the right place,—the right place, I mean, to act the most surely and the most effectively on the springs of life, or as an inspiration of good thoughts and desires." (*Ibid* pp. 244-245.) गरीब बिचारा डॉक्टर हडसन् ! आपल्या

असल्या उद्गारामुळे हिंदुस्थानातील एक कविलेखक आपल्यास वेड्याच्या इस्पितळात घालण्यास तयार होईल याची त्याला कल्पनाही नसेल ! !

वरील उताऱ्यासारखे आणखी अनेक उतारे शेक्सपिअरवर लिहिलेल्या निरनिराळ्या ग्रंथातून दाखविता येतील. परंतु तसे करूं पहाणे म्हणजे स्थल व काल याचा व्यर्थ अपव्यय होय. वाचकास वरील उताऱ्यावरून श्री. तांबे यानी स्वपक्षस्थापनार्थ शेक्सपिअरबद्दल केलेल्या विधानाची काय किंमत आहे हे कळून आलेच असेल. आणि वरील उतारे सोडून, कोणीही सूज्ञ वाचक स्वतःच जरी शेक्स-पिअरची नाटके थोड्याही काळजीने वाचेल, तरी त्याला श्री. तांबे याच्या धार्ष्ट्याचे आश्चर्य वाटल्यावाचून रहाणार नाही. त्याच्या वर उध्दृत केलेल्या वाक्यात त्यानी शेक्सपिअरच्या नाटकातील काही दुष्ट पात्राची नावे स्पष्टपणे घेतली असून 'बहुधा याचाच अती जयजयकार' असा भरमसाट शेरा शेवटी ठोकून दिला आहे. परंतु, 'मर्चट् ऑफ् व्हेनिस्' या नाटकात शेवटी शायलॉकचा जय कसा होतो, आणि 'मॅक्बेथ्' नाटकात शेवटीं लेडी मॅक्बेथ् कोणत्या रीतीनें जिंकते, हे एक तांबे याची प्रतिभाच सांगू जाणे ! शेक्सपिअरच्या या नाटकाकडे पहाण्याची एक नवीच दृष्टि त्यानी शोधून काढिली असल्यास न कळे ! आता त्यानी निर्देशिलेल्या पहिल्या व्यक्तीसंबंधी बोलावयाचे म्हणजे, ऑथेल्लो नाटकात शेवटी इआगोचाच "जय" होतो असे म्हणणाऱ्यास ते नाटक नीट समजलेच नाही असे म्हणावे लागेल. त्या पात्राच्या स्वभावाचे, कृत्याचे, व शेवटच्या स्थितीचे विस्तारपूर्वक विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. परंतु, या बाबतींत

आम्ही इतकेंच सांगतों कीं, शेक्सपिअरनें त्या नाटकाचे द्वारें, दुर्दैवी सज्जनाच्या दुःखांत होणाऱ्या मृत्यूपेक्षाही कित्येक नरपशूंचें जगणें देखील किती भयानक, किळसवाणें, व तिरस्कार उत्पन्न करणारें असतें हे दाखविलें आहे. उत्कृष्ठ नाटककार शेक्सपिअर यानें ऑथेल्लो नाटक इतक्या सुंदर रीतीनें रंगविलें आहे कीं, शेवटी इआगोला सुख तर प्राप्त होत नाहींच, परंतु या जगातील प्रत्येक साधारण प्रवृत्तीच्या मनुष्याच्या तिरस्कारास, छीःथूस, व धिःकारासच तो पात्र होतो. डेस्डिमोना मरूनही विजयी होते, इआगो जगूनही पराजित होतो. नाटक संपल्यावर प्रेक्षक इआगोची छीःथू करतात, तर उलट डेस्डिमोनाचाच 'जयजयकार' करीत घरीं जातात. असो. यासंबंधीं अधिक विवेचनासाठी वाचकानी शेक्सपिअरवर व विशेषतः ऑथेल्लो नाटकावर चिकित्सक पद्धतीने लिहिलेले कोणत्याही विद्वान ग्रंथकाराचें चांगले पुस्तक पहावे.*

*ऑथेल्लो नाटकाचा खोल अभ्यास केला असता शेवटीं पापी इआगोचा पराजयच झालेला कसा दिसतो याचे मार्मिक विवेचन डॉ. डाउडेन कृत *Shakespeare, His Mind and Art* यात पृष्ठे २४२-४४ वर सापडेल. 'किंग् लिअर' मध्येही शेवटी पापाचाच कसा पराजय होतो हे त्यांत पृ. २६८-६९ वर दाखविले आहे. शिवाय, शेक्सपिअरच्या सर्व नाटकांच्या एकंदर तात्पर्यासाठीं त्याचीं २७, ४८, २२९ इ. पृष्ठे पहावीं. ह्याच लेखक आपल्या *Introduction to Shakespeare* या पुस्तकात लिहितो: "It is the destroyer Iago who really perishes as a withered branch from the tree of humanity" (p. 78), आणि 'किंग् लिअर्' मधील कॉर्डेलिआच्या शोचनीय अंताबद्दल लिहितो: "Cordelia dies, but love is not defeated." (p. 79). येथें

## श्री. तांबे आणि कालिदास.

काविळ झालेल्या मनुष्याला सर्वच पिवळें दिसतें. जो परिणाम काविळाचा डोळ्यावर होतो, तोच परिणाम दुराग्रहाचे योगानें मनावर घडून येतो. श्री. तांबे यांना नीतीची ' बूज ठेवणारा ' एकही श्रेष्ठ कवी आढळणे दुरापास्त झाले आहे असें दिसतें. दुर्दैवानें —नव्हे, सुदैवानेच —हा दोष त्याच्या दृष्टीचा आहे, कवीचा नव्हे. शेक्सपिअर, वर्ड्स्वर्थ् इत्यादिकाप्रमाणें कालिदासासंबंधीही भलतीच विधाने बिनदिक्कत करण्यास श्री. तांबे यांनी मागेपुढे पाहिलेले नाही. नीति आणि कला यांचा संबंध नाकारणाऱ्या लोकांशीं वाद करणेच अत्यंत दुर्घट आहे. कारण वाद ही एक कलाच असल्यानें, त्यातसुद्धां नीतीचीं बंधनें पाळण्याची आवश्यकता नाही असे हे कदाचित म्हणावयाचे !

आपला पक्ष कसा तरी प्रस्थापित करण्याच्या लटपटींत श्री. तांबे यानीं कविकुलगुरु कालिदासाच्या शाकुंतल या जगप्रसिद्ध सर्वश्रेष्ठ कृतीबद्दल कसे विकृत प्रलाप काढले आहेत पहा: " शाकुंतलातील नायक राजा दुष्यन्त हा परमपूज्य कुलपति कण्वऋषि यांच्या पुण्याश्रमांत त्यांच्या गैरहजिरींत **चोरासारखा शिरतो.** ( शकुंतलेला त्याजकडे पोचती करावयास गेलेल्या ऋषिकुमाराने त्यास चोरच म्हटलें

असें खेदानें म्हणावे लागतें कीं, नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या श्री. ग. ह. केळकरांच्या " शेक्सपियर व तत्कालीन इंग्रजी रंगभूमि, " या पुस्तकांत त्याच्या नाटकांचा त्याच्या नीतिपरतेच्या महत्वाच्या दृष्टीनें विशेषसा विचार केलेला नाही. शायलॉक् व लेडी मॅक्बेथ् यांच्या संबधात सदर पुस्तकाचीं १०९-११०, व १४२-४३ हीं पृष्ठें पहावीं.

आहे...) येणेप्रमाणे शिरून कुलपतीचे केवळ 'उच्छ्वासितच' अशी सुदर शकुंतला हिला फुस लावतो आणि इतका लंपट होतो कीं, ती गुरुजनाच्या संमतीविषयी आग्रह करीत असता गांधर्वविवाहाच्या थापा व दाखले देऊन तिच्याशी चोरटा विवाह करितो ! केवढी नीतिमत्ता ही ! ! साप्रतच्या कायद्याप्रमाणे पिनल कोडचे पुरे ४९५ कलम ! बरे, पुढें तरी त्याने सचोटीने वागावयाचे होते. पण येणेप्रमाणे त्या बिचारीला फसवून तेथेच टाकून हे राजेश्री आपल्या राजधानीत जाऊन आपल्या राण्यांमध्यें दंग होतात व तिला साफ विसरतात ! पुढे कण्वऋषि घरी आल्यावर त्यास हा सारा प्रकार समजल्यावर चोराला चोरीचें धन पोचतें करावें अशा शुद्ध भावनेनें या फसव्या राजाकडे आपली लाडकी कन्या पाठवितो तेव्हा हे नीतीचे समुद्र मनातून तिच्या रूपयौवनाला पाघळत असता वरून 'न दर्शनीय परकलत्रम्' असा नीतीचा कांगाव करून तिचा सबंध तोडतात ! याचें नाव नीति ! पण कोणी म्हणेल राजा काय करील ? दुर्वासाने शकुंतलेला शाप दिला होता. त्यामुळे राजा ही गोष्ट विसरला. पण मूळ प्रश्न तर हाच आहे की, कालिदासाला नीतीची बूझ राखावयाची असती तर मूळ महाभारतातील गोष्टीत दुर्वासशापाचें कुलंगडें नसता, त्याने असा अनीतिकारक प्रसंगच का निर्माण केला असता ?" (पृ. ७-८, जाड टाइप आमचा. कंसातला मजकूर मूळचा.)

कालिदासाची जगातील सर्व विद्वानानीं मुक्तकंठाने केलेली स्तुति पाहून हिंदुधर्मसंस्कृतिसाहित्यादिकाविषयीं अत्यंत द्वेषानें प्रेरित झालेल्या एखाद्या ख्रिस्ती मिशनऱ्याच्या विषारी फूत्का-

रांतला हा उतारा नसून, श्री. भा. रा. तांबे यांच्या " कला आणि नीति " या निबंधातला हा एक उतारा आहे, हे येथें वाचकांना पुन्हा सांगणे आवश्यक वाटते ! यातील जाड टाइपातल्या शब्दसमूहाचे समग्र खंडन करणे येथे स्थलाभावी शक्य नाहीं. वास्तविक, ते आवश्यकही नाहीं. कोणीही मूळ शाकुंतल पूर्वग्रहदूषित न होतां एकदाही वाचावे, म्हणजे वरील विधानाची सत्यासत्यता पटण्यास फारसा उशीर लागणार नाही. इतके कशाला, मूळ शाकुंतलाकडे न वळता, प्रो. मिराशीकृत " कालिदास " यात पृ. १७७-१९४ मध्ये दिलेला शाकुंतलाचा सुंदर व विस्तृत गोषवारा, आणि त्यातच पृ. १९५-२१६ मध्ये किंवा श्री. गोडबोले यांनी " महाराष्ट्र शाकुंतलास " जोडलेल्या 'शाकुंतल विचार' या पुरवणीमध्ये केलेले त्यांचे अत्यंत मार्मिक विवेचन एकदा नीट वाचले तरी काम होईल.

नमुन्यासाठी म्हणून श्री. तांबे यांच्या उपर्निर्दिष्ट कांहीं विधानातला फोलपणा आम्ही येथे दाखवितो. आपल्या राज्यांत जाऊन आपल्या **राण्यांमध्ये दंग** होण्याइतक्या **कर्तव्यशून्य विषयलंपटतेचा** घाणेरडा आरोप दुष्यंतावर करण्यापूर्वी, श्री. तांबे यांनी शाकुंतल काळजीपूर्वक वाचले असते, तर त्यातला नायक दुष्यंत राजा हा किती कर्तव्यदक्ष, सदैव प्रजाहिततत्पर व न्यायनिष्ठुर दाखविला आहे ( प्रो. मिराशीकृत " कालिदास " पृ. २०६-२०८ अवश्य पहावें ) हें त्यांना कळून आले असते. श्री. तांबे यांना दुष्यंताचा कण्वाश्रमातला प्रवेश **चोरासारखा** दिसतो; आणि आधार काय तर, दुर्वासशापामुळेंच राजास शकुंतलेची विस्मृति पडली आहे हें माहीत नसल्याने चिडलेल्या शार्ङ्गरवाने रागाने काढलेले उद्गार !

उलट, प्रो. मिराशींच्या शद्वात वस्तुस्थिति वर्णन करावयाची म्हणजे, " तपोवनाजवळ पोहोचल्यावर **तेथील जनांस उपसर्ग होऊं नये म्हणून** तो रथातून उतरतो व आपलें धनुष्य व अलंकार सारथ्याच्या स्वाधीन करून विनीत वेषाने तपोवनात शिरतो. " ("कालिदास " पृ.१७८. शाकुंतल अंक १ पहा.) यालाच श्री. तांबे ' चोरासारखें ' म्हणत असावे ! शिवाय दुष्यंतावर चोरीचा आरोप बेधडक करण्यापूर्वी नाटकाचे प्रारंभीच वैखानसानें राजाला आश्रमात प्रवेश करण्यासाठीं **आमंत्रण** दिले होतें, हें श्री. तांबे यांना माहीत नाहीं काय ? राजाला **प्रवेश केल्यानंतरच** शकुंतलेचे दर्शन झालें; मग चोरासारखा प्रवेश करण्याचें प्रयोजनच काय ? ' गांधर्व विवाहाच्या थापा, ' 'चोरटा विवाह', ' फुस लावतो ' इत्यादि शद्वप्रयोग देखील निषेधार्ह आहेत. हिंदुधर्मात गांधर्व विवाहाला मुळीच अस्तित्व नसून त्यासंबधात दुष्यंत धडधडीत खोटें बोलला, असें श्री. तांबे याना म्हणावयाचें आहे काय ? दुष्यंतानें शकुंतलेला ' फसविले ' असा गर्हणीय आरोप करताना, मदनतापाने स्वतः शकुंतलेचीच किती कठीण अवस्था झाली होती ( अंक ३, सख्याची भाषणे पहा ) याची श्री. तांबे याना विस्मृति पडली. दुष्यंताशी विवाह न जमवून आणल्यास मला तिलोदक द्या असा निर्वाणीचा संदेश तिनें आपल्या सख्याना स्पष्ट दिला होता.(अंक ३.) आणि, दुष्यंतशकुंतलेचा हा संबंध श्री. तांबे याच्या म्हणण्याप्रमाणें केवळ फसवेगिरीचा व्यवहार असता, तर कण्वाचा त्या संबंधाला आशिर्वाद मिळाला असता काय ? स्वतः कण्वमुनींनीं त्याला " चोरानें चोरीनें प्राप्त केलेलें धन " असें न म्हणतां, " सच्छिष्याला दिलेल्या विद्येची " च

उपमा शकुंतलेला दिलेली आहे.(अंक४प्रियंवदेचे भाषण पहा). स्वतःच्या उछ्वसितच अशा कन्येशीं स्वतःच्या पश्चात् तिला फसवून व्यभिचार करणाऱ्या व्यक्तीला शासन न करण्याइतके कण्वमुनी षंढ होते किंवा त्यांना राजाची भीड पडण्याइतके लोभी होते, असे श्री. तांबे याच्या विधानास प्रमाण मानल्यास मान्य करावे लागेल, याचा विचार त्यानीं केला आहे काय ? प्रत्यक्ष घरी चालून येत असलेल्या सुंदर स्त्रीला अधर्माचे भीतीने नाकारणाऱ्या —नव्हे, तिच्याकडे नीट पहाण्याची इच्छाही दाबणाऱ्या–मनोनिग्रही दुष्यंताच्या कृतीला **नीतीच्या कांगाव्याचें** स्वरूप देणाऱ्याच्या विकृत दृष्टीचीच कीव केली पाहिजे. दुष्यंतावर इंडियन पिनल कोडचें ४९५ (?) कलम बजाविण्यापूर्वी शकुंतलेचे वय व तिनें स्वतः वियाहाला दिलेली समति— नव्हे, तिनें स्वतः दाखविलेली उत्सुकता — श्री. तांबे यानीं लक्षात घेतली असती, तर त्याच्या स्वतःवरच अब्रूनुकसानीचें ४९९ कलम दुष्यंताकडून बजाविलें जाण्याची भीति राहिली नसती !

श्री. तांबे याच्या शाकुंतलविषयक उपर्निर्दिष्ट उताऱ्यातील शेवटच्या वाक्याचा तर काय अर्थ आहे हेंच आम्हाला समजत नाही. कालिदासाला ‘ नीतीची बूझ राखावयाची होती ’ म्हणूनच तर त्यानें दुर्वासशापाचें “ कुलंगडे ” (!) मूळ गोष्टींत नसतांही उत्पन्न केलें. शाकुंतल नाटक नुसतें नीट चाळणाऱ्यालाही कालिदासानें अत्यंत कौशल्याने निर्माण केलेल्या या प्रसंगाचा परिणाम मूळ गोष्टीला संपूर्णपणें नीतिपर करण्याकडेच कसा झाला आहे हें कळून येईल. या दुर्वासशापाच्या “ कुलंगड्या ” चें खरें स्वरूप, महत्व व त्यामुळें कथानकावर झालेला उत्कृष्ट परिणाम याचे प्रो. मिराशींनीं

" कालिदास " पृ. १९६-१९८ वर आणि श्री. गोडबोले यांनी शाकुंतल विचार( ' महाराष्ट्र शाकुंतल ' )पृ. १५-१६ वर सुंदर व मार्मिक विवेचन केले आहे ते यासंबंधात अवश्य वाचावे, म्हणजे श्री.तांबे यांनीं कालिदासावरही केलेल्या निराधार आरोपाची किमत स्पष्ट कळून येईल.

श्री. तांबे यानी स्वपक्षस्थापनार्थ शाकुंतल नाटकाविषयीं केलेल्या विपर्यस्त विधानापैकीं काहींचें खंडन वर केले. यापेक्षां जास्त खंडनाची आवश्यकता असल्यास वाचकानी शाकुंतल नाटकच वाचावे. शेवटी जाता जाता, ज्या दुष्यंतशकुंतलेच्या संबंधाविषयीं श्री. तांबे यानी घाणेरडे उद्गार काढले आहेत, त्याचे मूळ स्वरूप कसे आहे हे दर्शविणारी प्रो. मिराशींचीं कांही थोडीं वाक्यें आमच्या म्हणण्यास पुष्टि म्हणून येथे उद्धृत केल्यावाचून आमच्याने राहवत नाही. ते म्हणतातः कण्वऋषींना सोमतीर्थावरून परत येण्यास "सहजच चार सहा महिने लागले असावेत. या अवधीत यज्ञरक्षणार्थ आश्रमवासीयांच्या विनंतीवरून दुष्यन्त आश्रमात राहिला, त्याचा व शकुंतलेचाही मदनसताप उत्तरोत्तर वाढत गेला व तो अगदीं असह्य झाला त्यावेळीं त्यानीं गान्धर्व विवाह केला. असे कवीने दाखविलें आहे. यात अस्वाभाविक असे काहीही दिसत नाहीं. " ( पृ. २०१ ) कालिदासाच्या दुष्यंताचे वर्णन करताना ते लिहितातः "...त्याच्या प्रजेतील अत्यंत निकृष्ठ लोकही कुमार्गगामी नाहींत असें शार्ङ्गरव म्हणतो...तो अत्यत धार्मिक, पापभीरू व प्रजापालनतत्पर आहे...दिसेल त्या सुंदर स्त्रीवर आषक होण्याइतका तो मधुकरवृत्तीचा नाहीं...कण्वाश्रमात गेल्यावर...सौंदर्याची पुतळी अशी शकुंतला त्याचें मन आकृष्ठ करते. प्रथम ही ब्राह्मणकन्यका

असेल काय असा त्याला संशय येतो. **तसें शेवटीं ठरतें तर इन्द्रियनिग्रह करून त्यानें आपलें मन परावृत्त केलें असतें यांत संशय नाहीं.** पण स्वतःच्या सदसद्विवेक बुद्धीला विचारता तीं स्वतःला विवाह्य असावी असे त्याला वाटते...त्यानी शकुंतलेच्या जन्मवृत्तात सांगितल्यावर तर मुळीच संशय राहत नाही. **शकुंतलेचीही आपल्यासारखीच अवस्था झाली आहे असे पाहून** त्याचा मदनविकार वाढत जातो. **कण्व लौकरच परत येण्यासारखा असता तर तोंपर्यंत त्यानें अवश्य इन्द्रियनिग्रह केला असता.** पण तिकडे शकुन्तलेची अतिशय वाईट अवस्था झाली होती... तिचे निर्वाणीचे उद्गार त्याने ऐकिले होते. तेव्हा **तिच्या सख्यांनीं तिचा स्वीकार करण्याविषयीं विनंती केल्यावर** तो ती आनदानें मान्य करतो यांत आश्चर्य नाही...साराश, पराक्रमी, विनयशील, धार्मिक, प्रेमळ व कर्तव्यतत्पर अशा या धीरोदात्त नायकाचे चित्र काढून कालिदासाने आपल्यापुढे आदर्श पुरुष उभा केला आहे." (पृ. २०७ ते २०९ जाड टाईप आमचा). ज्याला प्रो. मिराशी 'आदर्श पुरुष' असे साधार संबोधितात, त्याच्यावरच श्री. तावे इं. पि. कोडचे ४९५ कलम बजावूं इच्छितात यावरून कोणाविषयीं काय सिद्ध होते हे सूज्ञ वाचकानी स्वतःशीच ठरवावे !

स्वतः श्रेष्ठ कवि असलेल्या एका लेखकाने जगप्रसिद्ध कवि व नाटककार शेक्सपियर आणि कालिदास याच्याबद्दल असलीं गैरसमजकारक, विपर्यस्त व उघड उघड चुकीचीं विधाने जाहीरपणाने—आणि तेही एका कविसमेलनाचे अध्यक्षपदावरून—करावी, हे एक अत्यंत उद्वेगजनक दृश्य आहे, इतकेच म्हणून आम्ही या विषयाची रजा घेतो.

## श्री. तांबे यांचें ओलेतीच्या चित्राचें समर्थन.

महाराष्ट्रात कला व नीति याच्या संबंधाचा वाद जाहीरपणें उजेडात येण्यास एका मासिकात आलेले ' ओलेती ' चे चित्र मुख्यत्वें-करून कारणीभूत झाले हे पुष्कळास माहीतच असेल. हे चित्र प्रसिद्ध झाल्यानतर त्याच्या गुणावगुणाविषयी बराच वाद माजला. श्री. तांबे यानी आपल्या निबधात त्याचे समर्थन करण्याचा प्रयत्न केला असून त्याप्रीत्यर्थ त्यानी दोन मुद्दे पुढे आणले आहेत. पैकीं पहिला मुद्दा असा कीं, " प्रत्यक्ष ओलेती सुंदरी पाहून ज्या भावना उद्भवतील त्याच भावना ओलेतीचे चित्र पाहून उद्भवणार नाहींत. कारण ओलेती सुदरी पार्थिव हाडामाराची आहे तर ओलेतीचे चित्र मनोमय चैतन्याने ओथबलेले आहे. हाडामासाच्या ओलेतीला पाहून पापवासना उत्पन्न होण्याचा संभय आहे.........पापवासनेचे स्थान पार्थिव शरीर, चित्रार्पित ओलेतींत हाडामासाचें शरीर कोठे आहे ? तेव्हा पापवासना कशात गुंतावी ? " ( पृ. २३–२४ )

नीति व कला याची फारकत करण्याच्या भरात श्री. तांबे यानी केलेले ' ओलेती ' च्या चित्राचे हे समर्थन खरोखरच अपूर्व आहे ! श्री. तांबे याना येथें एकच प्रश्न विचारावासा वाटतो; आणि तो असा कीं, ' ओलेतीच्या ' चित्रात प्रत्यक्ष हाडामासाचे शरीर नसल्याने तेथे पापवासना गुंतू शकणार नाहीं, या मुद्यावर जर त्या चित्राचें समर्थन करावयाचे असेल, तर मग सबंध चित्रसृष्टींत अश्लील किंवा वाईट असें चित्र तरी कोणतें राहिलें ? कोणतेही –कितीही घाणेरडे–चित्र घेतले तरी त्यात अर्थातच

हाडामासाचे शरीर हे नसणारच. मग एखादे अत्यंत बीभत्स चित्र कोणी काढून श्री. तावे यांच्या वरील अपूर्व मुद्याचे जोरावर तो त्या चित्राचे समर्थन करूं लागला तर त्याला श्री. तावे काय उत्तर देणार ? श्री. तावे याचे वरील आश्चर्यकारक विधान जर प्रमाण मानले, तर आजकालच्या चलच्चित्रपटातील उघड उघड अश्लीलतेविरुद्ध सूज्ञ व विचारी लोकांनीं चालविलेली सर्व ओरड व्यर्थच आहे असे ह्मणावे लागेल !* आणि अशा रीतीने संपूर्ण चित्रकलेस अश्लीलता व पापवासनाना उत्तेजन या दोषद्वयापासून अलिप्त ठरविल्यानंतर, गायनकला व लेखनकला याविषयी तर बोलावयासच नको. कारण चित्रकलेत नुसती आकृति तरी डोळ्यापुढे असते; परंतु, गायनांत व लेखनात तर तीही नसते. मग एखादे लिखाण किंवा काव्य कितीही अश्लील, हलक्या दर्जाचे व अनीतिमान् असले तरी त्याच्या कर्त्याने ' यात पापवासना गुंतविणारे हाडामासाचे शरीर कोठे आहे ?' असे ह्मणून त्याचे खुशाल समर्थन करावे ! श्री. तावे याच्या वरील मुद्याचे याहून अधिक खडन करण्याची आवश्यकता आहे

*जर्मनीत " सर्वसामान्य चित्रपट पाहाण्यास १५ वर्षांच्या आंतील मुलामुलींना बंदी आहे. इतकी मुलामुलींच्या नीतिमत्तेविषयी सरकार काळजी घेते." (" जर्मनीतील चित्रपट, " केसरी " ता. १४-१२-३४ ) वेडे बिचारें जर्मन सरकार ! ' पापवासनेचे स्थान पार्थिव शरीर, चित्रमय चलचित्रपटांत हाडामासाचें शरीर कोठे आहे ? तेव्हां पापवासना कशात गुतावी ? इतके देखील त्याना समजत नाहीं !! चित्रपटकलेचा आणि नीतिमत्तेच संबंध तरी काय !

असे आह्मास वाटत नाहीं !

ओलेतीच्या चित्राच्या समर्थनार्थ श्री. तांबे यानी जो दुसरा मुद्दा पुढे आणला आहे तो वरील मुद्याप्रमाणे पोचट नसून भरीव व विचारार्ह आहे. परंतु, आश्चर्याची गोष्ट अशी कीं, त्याचा जो जो अधिक विचार करावा, तो तो तो एखाद्या बदललेल्या साक्षीदाराप्रमाणे श्री. तांबे याच्या नीति व कला यासंबंधीच्या प्रमेयालाच विरोध करून, त्याच्याविरुद्ध सिद्धातास पुष्टि देताना आढळून येतो. ते ह्मणतात: " दुसरे—आणि मुख्यत्वेकरून असे की, ही गोष्ट कलाकाराच्या **दृष्टीच्या पोचेवर** आणि त्याने **योजलेल्या साधनावर** अवलबून राहील. त्याला जर आपल्या स्फूर्तिबलाने पूर्ण सौदर्य व्यक्त करता आले तर त्याच्या कौतुकात आणि अलौकिक आनदात आपण इतके लीन होऊन जाऊ की, कोणत्याही अन्य भावनेस त्या सहजसमाधींत अवकाशच राहणार नाही······केवळ त्या संपूर्ण सौंदर्याशी अलौकिक आनंदाशी आपण अगदी समरस होऊन जाऊं." (पृ. २४ जाड टाइप आमचा.)

आता आपण श्री. तांबे याच्या या वाक्याचा, त्याच्याच निबंधात इतरत्र आढळणाऱ्या विधानाच्या मदतीने, नीट विचार करून त्यापासून खरोखर कोणत्या पक्षाला पुष्टि मिळते हे पाहू. वरील विधानाचा सरळ निष्कर्ष असा निघतो की, श्री. तांबे याचे मताने देखील कलाकारानें आपली पोच अशी ठेविली पाहिजे व त्याने कलानिर्मिति करताना **अशींच साधनें** व **तीही अशाच रीतीनें वापरली पाहिजेत** की, जेणेकरून त्याच्या कृतीत **पूर्ण सौंदर्य** व्यक्त **होऊन** तज्जन्य आनंदाहून अन्य कोणत्याही भावना प्रेक्षकांच्या

( भोक्त्याच्या ) मनात उद्भवणार नाहीत. आता आम्ही येथे स्पष्ट सांगू इच्छितो की, श्री. तांबे यांच्या लेखणीने यावेळेस त्यांना दगा दिला असून, या प्रसंगी स्वतःच्याच प्रमेयाविरुद्ध एक फार महत्वाची कबूली त्यांनीं नकळत देऊन टाकली आहे. पहा की, त्यांनी स्वतःच इतरत्र म्हटल्याप्रमाणे उत्कृष्ठ कलेपासून उत्पन्न होणारा हा पूर्ण सौंदर्याचा आनंद विषयानंदाहून भिन्न असून तो 'पवित्र' व 'निष्काम' असतो (पृ. २३) ; आणि त्यात अपरंपार मांगल्य, सत्य व पावित्र्य असून तो पुण्यस्वरूप असतो. (पृ. १३,१५). आता, पूर्ण सौंदर्य व तज्जन्य आनंद हे पवित्र, मंगल, पुण्यस्वरूप असतात हे मान्य केले, ह्मणजे तदन्य ज्या भावना त्या अर्थातच अपवित्र, अमंगल व पापस्वरूप झाल्या हें उघड आहे. व ह्मणून आता या विशेषणाचा स्पष्ट उपयोग करून श्री. तांबे यांच्या वरील विधानाचा असाच अर्थ करावा लागेल की, 'प्रत्येक कलाकाराने आपली पोंच अशी ठेविली पाहिजे व अशाच साधनांचा अशाच पद्धतीने उपयोग केला पाहिजे की, जेणेकरून त्याच्या कृतींतील सौंदर्याचे द्वारें प्रेक्षकाचे मनात फक्त पवित्र, मंगल व पुण्यस्वरूप—ह्मणजेच उच्च, सात्विक व नैतिक—आनंद उत्पन्न होऊन, अपवित्र, पापी व अमंगल—ह्मणजेच अनैतिक—भावनांना ( कल्पनांना, विचारांना ) उत्पन्न होण्यास यत्किंचितही अवसर मिळणार नाही.' पण आह्मी तरी याव्यतिरिक्त विशेष काय सांगत आहोंत ? नीतीचें बंधन कलेनें पाळलेंच पाहिजे—आणि तेंही दुहेरी रीतीने, एकतर कलाकाराचें ध्येय ( हेतु ) नीतिपर असलें पाहिजे, व दुसरें, त्यानें साधनांचा उपयोग सुद्धा परिणामीं अनीति उत्पन्न न होता नीतीचाच उद्भव होईल

अशी पूर्ण काळजी घेऊन केला पाहिजे—याविषयीं आमचें तरी म्हणणे याहून विशेष अधिक ते काय आहे ? एखादा विरोधक श्रेष्ठ कोटीचा असला म्हणजे त्याचा कितीही गैरसमज झाला असला तरी कोणत्या ना कोणत्या स्वरूपात त्याचे मुखांतून सत्य बाहेर पडतेच, तें असे ! पण मग, कलाकाराने आपल्या साधनाचा उपयोग नीतीकडे लक्ष ठेवूनच केला पाहिजे असे आग्रहाने सागणाऱ्या या विधानांचा श्री. तांबे याच्याच पुढील वाक्यांशी मेळ कसा घालावयाचा ? " मला वाटते कला आणि नीति याचा स्वभावतः काडीइतका संबंध नाही. उलट, कला आपल्या लीलाविलासात चूर असता नीति-अनीतीच्या भानगडीत पडावयास तिला सवडच नसते असे दिसून येते. नीतीचा बागुलबोवा पुढे ठेवून कलेने आजपर्यंत कधीही पाऊल टाकले नाहीं आणि पुढे तरी कधी ती नीतीची बूज राखील कीं नाहीं याची वानवाच आहे." (पृ. २.) कलेच्या अंतिम ध्येयाचे स्वतः श्री. तांबे यानीच त्याच्या निबधाच्या उत्तरार्धात काहीं प्रसंगी योग्य वर्णन केले आहे; ते वाचल्यानतर त्याला विसंगत अशीं त्यानीं केलेलीं वरीलसारखीं विधाने पाहिलीं म्हणजे आश्चर्य वाटतें. कलाकाराची पोच नैतिक व सात्विक आनंद उत्पन्न करण्याकडेच असली पाहिजे असे उघड उघड प्रतिपादणारे लेखक दुसरीकडे " कलानीं नीतीचे ध्येय सोडतां कामा नये " या विधानाला " वितंडवादात " घालण्यास तयार होतात ! (पृ. ४) आणि अत्यंत आश्चर्याची गोष्ट अशी कीं कलेच्या "स्वातत्र्या" बद्दल भरमसाट विधाने करतांना तर श्री. तांबे यांच्या हळुवार मनाला कलेवर, नीतीचे तर दूरच राहो, पण सौदर्याचे देखील बंधन घालण्याची कल्पना सहन होत नाहीं ! !

" सत्य, नीति किंवा सौंदर्य याची भरभक्कम बोचकी, तिच्या कल्पना-भावनादि पंखावर लादलीं तर तिची धडगत राहणार नाहीं. तिचे पंख तुटून पडतील " [ पृ. १२ ]. कलेवर नीतीचे तर नकोच पण सौंदर्याचेही बंधन नको असे प्रतिपादन करणारे याव्यतिरिक्त दुसरें एखादे विधान जगाच्या संपूर्ण साहित्यसागराच्या तळापर्यंतही बुडी मारून हातीं लागेल किंवा नाहीं याची वानवाच आहे.* कारण नीति व कला यांचा संबंध तोडूं पहाणारे लेखक सुद्धा सामान्यतः सौंदर्य हा कलेचा आत्मा आहे असे मानतातच. निरंकुशाः कवयः, दुसरें काय ?

असो. श्री. तांबे यांच्या निबंधावर टीका करण्यात, आमचा उद्देश, सामान्य वाचकांच्या मनात भलत्याच समजुती भरविणारीं व त्यांची दिशाभूल करणारीं त्यातील कांही महत्वाचीं दोषस्थले जनतेसमोर उघड करणें, इतकाच असल्याने हे परिशिष्ट याहून जास्त वाढविण्याची आमची इच्छा नाही. श्री. न. चिं. केळकर यांनीं नुकतेच एका जाहीर सभेत म्हटल्याप्रमाणे श्री. तांबे यांच्या " कलेवर अनीतीचा आरोप येण्यासारखा नाहीं " ( " केसरी, " ता. २०-११-३४ पृ. ७ पहा ) यात संशय नाहीं. परंतु, आम्ही या परिशिष्टाच्या प्रारंभी सांगितल्याप्रमाणे, कला व नीति याविषयींच्या त्यांच्या विपर्यस्त विधानांनीं समाजातील सर्वसाधारण वाचक-वर्गावर अनिष्ट परिणाम घडून येण्याचा संभव असल्यानेच आह्मी हे अप्रिय कार्य केले आहे. एखादी व्यक्ति जितकी श्रेष्ठ तितकाच

*काव्याने सौंदर्याचे बंधन पाळण्याची आवश्यकता श्री. द. के. केळकर यांनी ' काव्यालोचनात ' ( पृष्ठें १९६-२०४ ) सविस्तर सिद्ध केली आहे.

तिच्या चुकाचाही परिणाम अधिक व्यापक असतो हे उघडच आहे. नीति, कला व सौंदर्य याविषयींच्या काही गैरसमजुतीना त्यांनीं रजा दिली, तर त्यानाही या पुस्तकात प्रतिपादिलेले प्रमेय मान्य होण्यासारखे आहे, हें आह्मी मागें योग्य स्थली दाखविलेच आहे. ह्मणून शेवटी, त्याच्या विधानातील सत्यपर अंशाकडेच दृष्टि ठेवून इतर भागाकडे दुर्लक्ष करण्याची वाचकाना विनंति करून, व आह्मी या पुस्तकात केलेल्या सद्धेतुमूलक टीकेचा योग्य विचार करून स्वतःच्या विचारात आवश्यक परिवर्तन घडवून आणण्याबद्दल श्री. ताम्बे याना विनंति करून हे परिशिष्ट संपवितो.

---

# परिशिष्ट आ

## कांहीं आक्षेपांस उत्तरें.



हजारो वर्षापूर्वी द्रौपदीवस्त्रहरणाचे प्रसंगी दृष्टोत्पत्तीस आलेल्या विद्वान्विमूढतेने या दुर्दैवी आर्यभूमीतील विद्वानावरील आपली पकड अद्यापिही ढिली केली नाही असे दिसते. अश्लीलतानिषेधाचा ठराव महाराष्ट्र साहित्यसंमेलनात पसार करून घेण्याचा कांही वर्षांपासून चाललेला प्रयत्न फलद्रूप न होता, डिसेंबर १९३३ मध्यें भरलेल्या नागपूरच्या अधिवेशनातही बऱ्याच वादाविवादानंतर शेवटी तो 'परत घेण्यात आला'. हा ठराव पसार होऊनही हेतुपुरःसर अश्लील वाङ्मय निर्माण करणाऱ्यावर किती परिणाम होईल हा भाग वेगळा; परंतु साहित्यसंमेलनातही तो पसार होत नाही याचे परिणाम मात्र फार घातुक होत आहेत. विशेषतः या ठरावाला विरोध करण्यात कांहीं सुविद्य विद्वानांनीही भाग घ्यावा ही तर अत्यंत खेदाची व नवलाची गोष्ट आहे.

नागपूरचा ठराव किती साधा होता पहाः "सांप्रत सदभिरुचीला विघातक आणि अश्लील स्वरूपाचें वाङ्मय स्वैरपणे प्रसिद्ध होत आहे, त्यास आळा घालणे या सभेस जरूर वाटते व ती अशा अनिष्ट वाङ्मयाचा प्रसार करणाऱ्यांचा निषेध करीत आहे. त्यापासून वाचकांनीं अलिप्त रहावें अशी या सभेची विनंति आहे."

(' अहवाल ' पृ. १९. जा. टा. आ. ) यात कोणता शब्द आक्षेपार्ह आहे हेंच आम्हाला समजत नाही. यासाठीं त्याला विरोध करणाऱ्याच्याच काहीं विधानाचा येथें विचार करूं.

ठरावास विरोध करताना सुप्रसिद्ध प्रो. वा. म. जोशी म्हणाले: " अश्लीलता ही कुणालाही नको आहे...पण हा ठराव मंजूर होऊ नये असें मला वाटते. या ठरावावरील चर्चा मोठी त्रासदायक होण्याचा संभव असतो. कारण त्यांत अनेक व्यक्ती व वर्तमानपत्राची नावें निघावयाचीं व त्यामुळे कित्येकाचीं मने दुखावली जावयाची. म्हणून हा ठराव नको होता. सरकारी दडपशाहीमुळे राजद्रोह नाहीसा होत नाहीं, उलट वाढतो मात्र, हे आपण जाणतोच. तीच अश्लील वाङ्मयाची स्थिति आहे... ' सेन्सारशिप ' कधींही यशस्वी होणार नाहीं, हें लक्षात ठेवा. " (' अहवाल ' पृ. १३. जा. टा. आ. )

मूळ ठरावात कोणाही व्यक्तीचे अगर पत्राचे प्रत्यक्ष नाव नसून केवळ ' सदभिरुचीला विघातक व अनिष्ट ' वाङ्मयाच्या प्रसारकाचा निषेध करण्याचा हेतु असता, वैयक्तिक उल्लेख टाळून वरील सर्व-साधारण ठराव पसार करणे अगदीच अशक्य होते काय? बरें, ज्या व्यक्ति बुद्धिपुरःसर असें वाईट काम करीत असल्याचे उघड असेल, त्यांचीं नावें जाहीरपणे अशा प्रसंगी अपरिहार्य प्रकारे पुढे आलीच, तर त्याची भीति किंवा भीड काय म्हणून बाळगावयाची? उद्या एखाद्या योग्य परिषदेत ' कोर्टकचेऱ्यात अन्यायाने पैसे खाणाऱ्याचा ही सभा निषेध करते ' असा ठराव आला तर, समाजातील काही शिष्ट धेंडांची मनें दुखावतील म्हणून त्याला विरोध करणे कितपत् योग्य होईल? समाजहित अधिक किंवा या शिष्टांची मर्जी अधिक?

आता प्रो. जोशी यानीं सेन्सॉराशिप् व राजद्रोह याचा दिलेला दाखला तर अगदींच गैरलागू आहे. अनीतिमान सत्तेनें नीतिमान चळवळीला दाबण्याचा केलेला प्रयत्न आणि नीतिमान सत्तेनें अनीतिमान चळवळीला आळा घालण्याचा केलेला प्रयत्न, याच्या परिणामात जमीनअस्मानाचे अंतर असतें, हे निदान नीतिशास्त्राच्या अभ्यासकाना तरी सागावयास नको. उदयोन्मुख प्रॉटेस्टट पंथाच्या न्याय्य चळवळीला आळा घालण्याचा जुलमी प्रयत्न काहीं युरोपीय सत्ताधीशानी करताच, किंवा मराटेशाहीला बाल्यावस्थेतच मूठमाती देण्याचा चग औरंगजेबाने बाधताच, याचा परिणाम म्हणून उलट ह्या नवीन पक्षाना सबळताच प्राप्त झाली हें खरें. परंतु, जेथें नीतिमान सत्ता अनीतिमान चळवळींना विरोध करू पाहील तेथें हा परिणाम घडून येणार नाहीं हे उघड आहे. आज फ्रास, इग्लड, किंवा अमेरिका देशात कोणी चळवळे राजद्रोहाची अनिष्ट चळवळ करू लागतील, तर तिचा यशस्वी रीतीने बीमोड केल्याशिवाय तेथील सरकार राहील काय ? प्रो. जोशी याचे म्हणणे मान्य केल्यास, सारा फौजदारी कायदाच गुडाळून ठेवावा लागेल. कारण ‘ अपराधाना शिक्षा द्याल तर लोकाची प्रवृत्ति तिकडे अधिकच वळेल ’ अशी भीति तेथेही प्रदर्शित करिता येईल ! हिंदुस्त्रिया व पुढारी याच्यावर अमानुष अत्याचार करणाऱ्या काहीं परधर्मीय नराधमाच्या पाशवी कृत्यांचा निषेध करण्यासाठीं एखादी सभा भरली असता, प्रो. जोशी हाच कोटिक्रम लढवून ठरावाला विरोध करू शकतील काय ? साराश, अधिक विस्तार न करता आम्ही येथें इतकेंच सागतों कीं, अनैतिक कृत्यांना विरोध करण्याचा नैतिक प्रयत्न, व नैतिक चळवळींना दाबण्याचा

अनैतिक प्रयत्न, या दोन प्रकारात घोंटाळा केल्यानेच प्रो. वा. म. जोशी यानी वरील दाखला दिला आहे. जोंपावेतो अश्लीलताप्रचार अनैतिक आहे हे निर्विवाद आहे, तोंपावेतो साहित्यसमेलनात त्याच्या निषेधपर ठराव पास झाल्याने एकंदर परिणाम इष्टच होतील, अनिष्ट होणार नाहींत. आता, सुज्ञानी एखादी गोष्ट करूं नका असे म्हणताच मुद्दाम ती करणारे काहीं व्रात्य लोक प्रत्येक समाजात असावयाचेच. परतु असल्या अपवादामुळे सामान्य नियमास बाधा येऊ शकत नाहीं.

प्रो. जोशी यानी पुढे माडलेला हाच मुद्दा इतरही अनेक व्याख्यानातून व लेखातून निरनिराळ्या रूपात पुढे माडला जातो. नागपूरच्या संमेलनातच एक स्त्रीप्रतिनिधी म्हणाल्या, “ मलाही अश्लील वाङ्मय नको आहे. परतु, असले ठराव मजूर करून ते नाहीसे होणार नाही······नव्हे, उलट त्यामुळे अश्लील वाङ्मयाला प्रोत्साहनच मिळेल ! म्हणून या ठरावाला मी विरोध करीत आहे ” (‘ अहवाल, पृ. ११ ). या असल्या विचारसरणीच्या मुळाशी असलेली चूक वर उघड करून दाखविलीच आहे. परंतु याशिवाय इतर चुकाही या ठरावाचे विरोधक करीत असतात. पं. दिनकरशास्त्री कानडे म्हणाले: “ नाटक-कादंबऱ्यातून तुम्हाला ‘ व्हिलन ’ निर्मावा लागतो. तो तेथे आला की, अश्लीलता स्वाभाविकच उत्पन्न होणार !” (‘ अहवाल,’ पृ. १३ ). आम्ही मागें तिसऱ्या प्रकरणात विशद करून दाखविलेला ‘ अनीतिविषयक आणि अनीतिपर ’ या दोन विशेषणातला घोटाळाच या विधानाच्या बुडाशीं आहे, हे चाणाक्ष वाचकांनीं ओळखलेच असेल. सदभिरुचीला धरून दुष्टपात्रे रगविणें

अशक्य आहे काय ? वाङ्मयांत अनीति विषय म्हणून येऊं द्या गुण म्हणून नको, हें आमचे म्हणणें आहे.

परंतु, नागपूरला या ठरावाला विरोध करणाऱ्यापैकीं अश्लीलतेचें सर्वांत मौजेचे समर्थन जर कोणी केले असेल तर ते श्री. के. नारायण काळे यानीं होय. काहीं एक विशिष्ट ज्ञान कांहीं वाचकाना देणें आवश्यक सिद्ध होत असेल, तर तें योग्य प्रकारे द्या. परंतु, तें देताना वाचकाच्या मनात "सदभिरुचीला विघातक व अनिष्ट" प्रवृत्ति उत्पन्न न होऊ देण्याची काळजी घ्या, असा आग्रह धरल्यास ते चूक होईल काय ? आणि हे चूक नसल्यास ठरावाला विरोध काय म्हणून ? पण श्री. काळे याचे सर्वांत मौजेचे विधान तर पुढेंच आहे. "......असल्या वाङ्मयामुळे तरी त्याला वाचनाची गोडी लागते. काहीं दिवसानी त्याची त्यालाच किळस येऊन तो चागले वाङ्मय वाचूं लागेल." ('अहवाल' पृ. १२ ). एखाद्या आळशी मनुष्याला चोऱ्या व धाडे पाडण्यास शिकवावे, व नंतर 'त्याला ते करूं द्या. पूर्वी काहीच करीत नव्हता त्यापेक्षा तर बरे ? काहीं दिवसानीं किळस येऊन तो स्वतःच सुधरेल,' असें म्हणण्याइतकेंच सूज्ञपणाचे वरील विधान आहे ! सुरवातीपासूनच लागलेली अश्लीलतेची चटक आपोआप सुटेल अशी आशा करणे, हें एखादा दारूबाज स्वतःहून तिचा त्याग करेल अशी आशा करण्यासारखेच आहे. वास्तविक पहातां, वाचनाची गोडी लावावयाची असेल तर त्याला अश्लीलतेची आवश्यकता नसून मनोरंजकत्वाची जरूर आहे. पण मनोरंजकता किंवा चित्ताकर्षकता म्हणजे अश्लीलता नव्हे. उलट, अश्लील मनोरजकतेचे परिणाम कसे घातुक होतात हें श्री. न. चिं. केळकर यानीं पुढील

शद्वात स्पष्ट सागितलें आहे. कोल्हटकराच्या " मतिविकारा " वरील टीकेंत ते ह्मणतातः " पात्र व प्रसग जर चित्ताकर्षक व लोकाचें मन रमविणारा असेल तर अशा ठिकाणीं अश्लीलता संबद्ध असू नये. चित्ताकर्षक असे पात्र, प्रसंग अगर विचार यांशीं सलग्न असलेली अश्लीलता चिरपरिचयाने स्वतःच चित्ताकर्षक होऊं लागते." ("केळकरकृत लेख-संग्रह, "पृ. १४९)

आम्ही प्रस्तुत विषयाचे सबंधात जीं काही थोडीफार पुस्तके वाचली, त्यात श्री. द. के. केळकर याचे " काव्यालोचन " व प्रो. मिराशींचे " कालिदास " ही दोन पुस्तके, त्यात दृग्गोचर होणाऱ्या सूक्ष्म व समतोल विचारसरणी, विषयाचा दाडगा व खोल व्यासंग, इत्यादि गुणामुळे आम्हांस फार आवडली हें येथे नमूद करण्यास फार आनद होतो. श्री. केळकर याना आम्ही प्रतिपादिलेली कलेची नीतिपरता मान्य आहे. " काव्यालोचना "त पृ. २०२ वर त्यानीं " सद्भावनापोषक अतएव सुदर " असा शद्बप्रयोग वापरून, नीति व सौंदर्य याचा निकट सबध स्पष्टपणे व्यक्त केला आहे; आणि शिवाय, कलेवर नीतीचे किंवा इतर निर्बंध नसावेत या मताचें अनेक ठिकाणीं खंडनही केले आहे. परतु, याच पुस्तकात काव्य व तत्वप्रतिपादन याच्या संबंधाविषयीं काहीं संदिग्ध व गैरसमजुतीस कारणीभूत होणारीं विधानें आम्हास आढळून आलीं; व एका चागल्या पुस्तकातली महत्वाची विसंगति दूर व्हावी या हेतूनेंच स्नेहभावपूर्वक पुढील दोन शद्व आम्ही लिहिले आहेत.

" काव्याचे अतिम ध्येय परमार्थ असावे की अन्य कांहीं असावें या विषयीं मतभेद " नसून, तें ध्येय परमार्थच आहे हें

" काव्यालोचन " कारास पूर्णपणें मान्य आहे ( पृ. २९० ). परंतु, काव्यध्येयाच्या एकंदर वादाचा समारोप करताना संदिग्धता उत्पन्न करण्याचा मोह त्यानाही आवरला नाही. " काव्यध्येयाचा तात्विक वाद चालू असता, **काव्य आणि काव्येतर वाङ्मय यांना साधारण असणारें तत्वप्रतिपादन** हे ध्येय न मानता, काव्याच्या सर्व प्रकाराना साधारण असणारा आल्हाद, हेच ध्येय मानणें युक्त होय. काव्यात आल्हादक्षमता आणि तत्वप्रतिपादन ही दोन्हीं असली तरी, या दोहींपैकीं **जें नष्ट झालें असतां काव्याचें काव्यत्व नष्ट होईल** तेच त्याचें अनन्य साधारण ध्येय मानले पाहिजे, आणि हें वैशिष्ट्य आल्हादक्षमता होय. " ( पृ. २३३. जा. टा. आ. ) या वाक्यावरून श्री. द. के. केळकरांच्या मते काव्यातून तत्वप्रतिपादन नाहीसे झालें तरी त्याचे काव्यत्व नष्ट होणार नाही, असे दिसते. हेच त्यानीं पृ.२२४ वर कालिदासाच्या 'मेघदूता'चा उल्लेख करूनही ध्वनित केले आहे.

परंतु काहींसा खोल विचार केला असता श्री. केळकराच्या वरील विधानात फार मोठी परस्पर विसंगति असल्याचे आढळून येते. काव्याचा हेतु केवळ रंजनच असें म्हणणाऱ्याची गोष्ट वेगळी; त्याना वर उध्दृत केलेले शेवटचे वाक्य पसत पडेल यात आश्चर्य नाहीं. (श्री.न.चिं. केळकरांनीं 'केसरी'त केलेलें "काव्यालोचना"चें परीक्षणपहा) पण, ज्यानीं काव्याचा अंतिम हेतु परमार्थ असून काव्य व काव्येतर वाङ्मय याना तत्वप्रतिपादन हें साधारण ध्येय आहे, हें एकदा मान्य केलें, त्यांना काव्यातून तत्वप्रतिपादनाची उचलपागडी झाली असताही त्याचें काव्यत्व नष्ट पावणार नाहीं, असें केव्हाही म्हणतां यावयाचें नाहीं. अंतिम ध्येयाच्या अर्थाविषयीं श्री. द. के. केळकरांचे मनात

गैरसमज वसत असल्याचे दिसते. पहा की, धोब्याचे अंतिम ध्येय जीवितरक्षण करणें व विशिष्ट ध्येय कपडे धुणें हें आहें. आतां तो कपडे धुणे सोडील तर तो धोबी राहणार नाहीं हे खरे. पण त्याबरोबरच, तो नुसतें आपल्या विशिष्ट ध्येयालाच धरून अंतिम ध्येयाचा त्याग करूं म्हणेल तर ते शक्य होईल काय ? त्याने जीवितरक्षणात्मक अंतिम ध्येयाची कास सोडताच तो मुळीं मनुष्यच राहणार नाहीं, मग धोबी राहण्याची गोष्ट कशाला? श्री.केळकराचे मनात अस्पष्ट होणे व नष्ट होणे या प्रकारांबद्दल घोटाळा झाला आहे.**अंतिम ध्येय अस्पष्ट होईल, पण नष्ट होऊं शकणार नाहीं.** विशिष्ट ध्येय अतिम ध्येयापेक्षा अधिक स्पष्ट रीतीने जगात वावरूं शकेल. पण त्याचा आधार हा त्याने घेतलाच पाहिजे. कृतघ्न होऊन ते जर त्याला समूळ हांकलून लावूं म्हणेल, तर तत्क्षणींच ते स्वतःही नष्ट झाल्याशिवाय रहाणार नाहीं. काव्याचे अंतिम व सर्वसाधारण ध्येय पारमार्थिक तत्वप्रतिपादन आहे हे एकदा मान्य केले, म्हणजे फार झाल्यास प्रत्यक्ष व्यवहारात ते अस्पष्ट होऊं देण्यास मान्यता देता येईल; पण ते समूळ नष्ट झालें तरी काव्याचे काव्यत्व टिकूं शकेल असे मात्र केव्हाही म्हणता येणार नाही.

याशिवाय, काव्य व काव्येतर वाङ्मय याना तत्वप्रतिपादन हे साधारण ध्येय आहे परतु आल्हाद हे काव्याचेच विशिष्ट ध्येय आहे असे म्हटल्यास, काव्येतर वाङ्मयाच्या विशिष्ट ध्येयात आल्हादाचा अंश नाहीं हे साहाजिकच ध्वनित होते. परतु असे म्हणण्यास श्री. द. के. केळकर याचे जवळ कोणता आधार आहे ? ललितकलाकृति व तदितर कृति यांतील भेद आमच्या अल्पमतीप्रमाणें आम्ही मागें दाखविलाच आहे, तो वाचकानी वाटल्यास या संबंधात पहावा.

---

# विशेषनामांची सूचि

## ( किरकोळ उल्लेख वगळले आहेत )

---

## या पुस्तकांत उल्लेखिलेल्या महत्वाच्या ग्रंथांची व नियतकालिकांची यादी.

(या यादीवरून आम्ही पुढील ग्रंथांच्या कोणत्या आवृत्तींचा उपयोग केला याचाही जरूर तेथे खुलासा होईल.)

**श्रीमद्दासबोध**, समर्थ रामदासस्वामी.

**गीतारहस्य**, लो. बाळ गंगाधर टिळक, १९१५. (बा. गं. टिळक, केसरी ऑफिस, पुणें)

"**केळकर,**" (दे. भ. तात्यासाहेब केळकर यांना एकसष्टाव्या वाढदिवसा-निमित्त समर्पण केलेला ग्रंथ), आवृत्ति तिसरी, १९३२, (केळकर वाढदिवस मंडळ, पुणें)

**गद्यगुच्छ**, न. चिं. केळकर, प्रथमावृत्ति, १९२६. (वि.ग. ताम्हणकर, बुधवार पेठ, पुणें सिटी)

**केळकरकृत लेखसंग्रह**, पुणे १९१५, (चित्रशाळा प्रेस, पुणे)

**लेखनकला**, वा. गो. आपटे, १९२६, (आनंद कार्यालय, पुणें)

**सौंदर्य आणि ललितकला**, वा. गो. आपटे, १९१९ (आनंदकार्यालय, पुणें)

**काव्यालोचन**, द. के. केळकर, १९३१, (अ. स. गोखले 'विजय साहित्य,' शनवार पेठ, पुणें)

**प्रतिभासाधन**, ना. सी. फडके, (हंस-प्रकाशन-संस्था कोल्हापूर) टीप—कर्त्याच्या सहीची प्रत नव्हे.

**कला आणि नीति**, भा. रा. तांबे, १९३२, (सखाराम बाळकृष्ण नाशिककर, पत्ता दिलेला नाही)

**कालिदास**, वा. वि. मिराशी, १९३४, ( नवभारत ग्रंथमाला, नागपूर )

**महाराष्ट्र शाकुंतल**, के. वि. गोडबोले, १९२५, ( के वि. गोडबोले, हुजुर चिटणीस, मं फलटण )

**शेक्सपियर व तत्कालीन रंगभूमि**, ग. ह. केळकर, १९३२, ( नवभारत ग्रंथमाला, नागपूर )

**गडकऱ्यांचा विनोद**, शि. गो भावे, १९२६, ( मद्य प्रकाशक मंडळी, गिरगाव, मुंबई )

**संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास**, पां. वा. काणे, आवृत्ति पहिली, १९३१, ( पा. वा. काणे, आंग्रेवाडी, गिरगांव बंकरोट, मुंबई नं. ४ )

**महाराष्ट्र साहित्यसंमेलन, अधिवेशन १८ वें ( नागपूर ) संपूर्ण अहवाल**, १९३४, ( चिटणीस, नागपूर )

**शिक्षणकला व मानसशास्त्र**, ह. ना नेने, १९३२ ( सौ. रामाबाई नेने, मोदीलाइन, सीताबर्डी, नागपूर )

**इंदू काळे व सरला भोळे**, वा. म. जोशी, १९३४, ( ह. वि. मोटे, प्रतिभाकचेरी,गिरगाव, मुंबई नं. ४ )

**फुलवात**, आ. रा. देशपांडे, ( वाग्विलास मंडळ, ६८९ बुधवार, पुणें )

*What Is Art?*, by Count Leo Tolstoy, Eng. Tran. by Aylmer Maude, (Oxford University Press )

*Outlines of a Philosophy of Art*, by R. G. Collingwood, 1925, ( Oxford University Press ).

*Indian Painting*, by Percy Brown, ( The Association Press, Calcutta; and Oxford University Press, London ).

## उल्लेखित पुस्तकांची यादी


*The Rudiments of Criticism*, by E. A. Greening Lamborn, 1926 (Oxford University Press).

*The Study of Poetry*, by A. R. Entwistle, 1932, (Thomas Nelson and Sons, Ltd; London).

*Essays*, by Bacon.

*The Theory of Good and Evil*, by Hastings Rashdall, L. L. D; in two vols, 1907, (Oxford University Press).

*Utilitarianism*, by J. S. Mill.

*The Metaphysics of Berkeley*, by G. W. Kaveeshwar, 1933.

*Shakespeare: His Life, Art and Characters*, by H. N. Hudson, L. L. D., Fourth Revised Ed., in 2 Vols, (Ginn and Co., New York)

*Shakespeare: His Mind and Art*, by Edward Dowden, L. L. D., 20th Edition, (Kegan Paul, Trench, Trubner & Co., London).

*Introduction to Shakespeare*, by Edward Dowden, 1907, (Blackie and Son, London).

*Shakespearean Tragedy*, by A. C. Bradley, Second Edition, (Macmillan & Co, London).

*Young India*, 1924-26, by Mahatma Gandhi, (S. Ganesan, Triplicane, Madras).

*Mahatma Gandhi's Ideas*, by C. F. Andrews.

*Plato's Dialogues*, Eng. Tran. by Jowett, in 4 Vols.

**केसरी**, अर्धसाप्ताहिक, पुणे

**महाराष्ट्र**, अर्धसाप्ताहिक, नागपूर.

**साप्ताहिक ज्ञानप्रकाश**, पुणे

**प्रतिभा**, पाक्षिक, गिरगाव, मुंबई ४.

**पारिजात**, मासिक, गिरगाव मुंबई ४.

**यशवंत**, मासिक, पुणे.

**रत्नाकर**, मासिक, पुणे

**माळवसाहित्य**, त्रैमासिक, इंदूर.

---

महाराष्ट्रांतील वृत्तपत्रांनी मुक्तकंठाने प्रशंसिलेले

नितांतरमणीय सामाजिक खंडकाव्य

# मोगरा

कविः—श्री. सं. भी. कुळकर्णी. प्रकाशकः—रा. ना नाईक.

या काव्यात कवीनें भावना आणि व्यवहार यांतील विसंवादाचें हृदयस्पर्शी चित्र फारच हळुवारपणे रेखाटलें असून तरुण-तरुणींच्या हृदयांतील नाजुक प्रेमभावाची परिणति उदात्त स्वरूपांत कशी होऊं शकते हे फार उत्कृष्ट तऱ्हेने दाखविलें आहे. काव्यास जोडलेल्या मार्मिक प्रस्तावनेत श्री म रा उपासनी ह्यांनी काव्यांतील सौंदर्य-स्थलांचा आपल्या सुंदर भाषेत उत्तम परामर्ष घेतला आहे

## कांहीं अभिप्राय.

केसरीः—" कवीचे पदलालित्य मधुर असून उपमांची योजनाही आल्हादक आहे प्रभात व संध्या, शेत व उद्यान, ओढा व समाधि, दसरा व दिवाळी इत्यादि वर्णनें विस्तृत, अलंकृत व मनोरम आहेत."

उदयः—" कथापात्रांच्या मुग्धप्रेमाचें आविष्करण अत्यंत सहज असे साधलें आहे, व कवीच्या गाढ भाषेनें त्यास विशेष शोभा आली आहे रचना हृदयंगम असून कल्पना रम्य आहेत "

किंमत १० आणे " नीति आणि कलोपासना " या पुस्तकाबरोबर घेतल्यास किंमत फक्त आठ आणे. ट ह. वेगळे

पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें.— ( १ ) म. रा. उपासनी, महेश्वर, ( होळकरस्टेट. ) ( २ ) चिटणीस, शारदासेवासंघ, मंडलेश्वर

मराठी भाषेतील पहिलेच संदेहपर्यवसायी नाटक

# शांतिस्वरूप

लेखक, प्रो. द. म बोरगांवकर, एम् ए , होळकर कॉलेज, इंदूर.

" इतके सुंदर नाटक लिहिल्याबद्दल रा बोरगांवकरांचे अभिनंदन करणे जरूर आहे " —तुतारी

" विचारसरणी तर्कशुद्ध असून कथानकाची मांडणी आणि भाषा आकर्षक आहे नाटकात नाविन्य व विचारस्वातंत्र्य बरेच आढळून येते." —आनंद

" हिंदु विवाह म्हणजे एक वैयक्तिक चैनीची बाब नसून तो एक महत्वाचा कौटुंबिक प्रश्न आहे हीच गोष्ट नाटकामध्ये मुख्यत्वेंकरून निदर्शनास आली आहे. मैनावतीचे ( नायिकेचे )भाषणप्रसंग खुबीदार रंगविले आहेत तिच्या बोलण्यातील कोट्या चांगल्या बिनतोड वाटतात तिने स्वत:च्या चंचल स्वभावाचे वर्णन थोडक्यात पण मोठें मार्मिक केलें आहे " —"केसरी "

किंमत बारा आणे पुस्तकाच्या प्रती लेखकाकडे किंवा परचुरे पुराणिक आणि मंडळी, माधवबाग, मुंबई, यांजकडे मिळतील

अत्यंत विश्वसनीय पुराव्यांच्या आधारावर लिहिलेले

## परलोकविद्येवरील मराठी भाषेंतील पहिलेंच पुस्तक

# रमा अथवा परलोकात्मे

लेखक —गजानन बाळकृष्ण साठे

या पुस्तकात लेखकाने परलोकविद्येचा पाश्चिमात्य आणि पौर्वात्य दृष्टीने उहापोह केला असून मृत आप्तांच्या वियोगानें तळमळणाऱ्या जीवांना समाधानाचा ओलावा मिळविण्याचे सुलभ मार्ग वर्णिले आहेत किंमत १ रुपया

पुस्तक मिळण्याचा पत्ता.—गजानन बाळकृष्ण साठे, वकील, महेश्वर ( होळकरस्टेट )

## माळव्यांतील सुप्रसिद्ध कवि

## श्री. य. खं. कुळकर्णी यांचें सटीप स्फुटकाव्य

# मानस-निष्यंद

मशीरबहादुर न. शं रहाळकर, बी.ए, ए कमिशनर, इंदूर यांची प्रस्तावना

### कविवर्य तांबे व साहित्याचार्य केळकर यांचीं प्रशस्तिपत्रें

### प्रमुख वर्तमानपत्रांचे उत्कृष्ट अभिप्राय

"ह्या स्फुटकाव्यसंग्रहात वाचक कांही कांही ठिकाणी अगदी तल्लीन होऊन जातो व कवीशी समरस होतो कल्पनांची अभिनवता, अर्थाची सुबोधता, प्रतिभेची उज्वलता तर पानापानावर चमकल्याखेरीज रहात नाही" ह्या व अशा कितीतरी कविता आहेत की ज्यांत आनंदाची, कौतुकाची ऊर्मि वाचकाच्या मनात उसळल्याशिवाय राहत नाही. शुचिता, साधेपणा, गांभीर्य, कळकळ, निर्व्याजमनोहर प्रेम इत्यादि गुण अत्यंत उठावदारपणे ह्यात झळकत असून शब्दसौष्ठवही साधल्याने रा कुळकर्णी यांचा "मानस निष्यंद" अत्यंत रसाळ वाटतो रा कुळकर्णी यांनी वाचकांना असेच थाटाचे सोहळे पुरवीत रहावे असा आशिर्वाद मनापासून आम्ही त्यांस देतो "-केसरी

"संस्कृतकविसंकेतांचे आणि अभिजात काव्याचे प्रतिध्वनि कवितांतून ठिकठिकाणी ऐकू येतात त्यामुळे मन प्रसन्न होते प्रेम, [illegible]मेश्वर इ उदात्त ध्येयाविषयीचे भक्तीमुळे कवितांना पावित्र्य आले .. पुस्तक संग्राह्य आहे" – आनंद, जून १९२३

मानसनिष्यंदात विषयवैचित्र्य भरपूर आहे भाषा प्रौढ, सुसं-टसटित आहे कवीच्या दहा वर्षांच्या व्यासंगाच्या मानाने [illegible]गति अभिनंदनीय आहे या काव्यसंग्रहाने महाराष्ट्रीय [illegible]यांत उत्तम भर घातली आहे"-चित्रमयजगत, जुलै १९२३.

[illegible]ी शारदादेवीच्या सोळा वर्षांच्या स्रक आणि एकनिष्ठ उपा-[illegible]ी कुळकर्णी यांची कवितावाळा यौवनाच्या यक्षभूमीत